आदर्श वाङ्मय प्रकाशन : ७

# मोपासाँच्या आणि इतर गोष्टी

विठ्ठल वामन हडप

आदर्श वाङ्मय-प्रकाशन, पुणें नं. २

कादंबरीकार हडप यांचें
आदर्श वाङ्मय प्रकाशन

दुलारी
विभावरी
वैकुंठींचा राणा
जाळ्यांतील मासा
आभास
चिरंजीव
लग्नलांछन
मोपासाँच्या व इतर गोष्टी

प्रथमावृत्ति जानेवारी : १९३७

किंमत एक रुपया

Printed by G. G. Diwakar, at Indira Press, 270 Sadash Peth, Poona 2; and Published by V. V. Hadap, at Adars Wangmaya Prakashan, 233 Sadashiw Peth, Poona 2.

# प्रास्ताविक

प्रख्यात फ्रेंच लघुकथालेखक मोपासाँ यांच्या गोष्टी मी मराठींत प्रसिद्ध करणार असें जाहीर आल्यापासून पुरोगामी विचारांच्या लोकांची गौरवदर्शक पत्रें मला आलीं, तशींच कांहीं सनातनी जनांचीं नापसंतीचींही पत्रें आलीं. ती नापसंती अशासाठीं कीं, मोपासाँच्या गोष्टी म्हणजे अश्लीलतेचा खजिना असा त्या सनातन्यांनीं संपूर्ण मोपासाँ न वाचतांच आपला गैरसमज करून घेतलेला दिसतो. आपल्या आंधळ्या सनातनी गैरसमजाची चांगलीच झळ लावून घेण्याचा अप्रमान मला यापूर्वीं आग्रहानें मिळाला असल्यानें व ती झळ पचवूनही मी आज समाजासमोर स्वतःच्या पायांवर साहित्यक्षेत्रांत उभा असल्यानें तसल्या एकांगी सनातनी विरोधाचें मला आतां कांहीं वाटेनासें झालें आहे. अर्थात् वास्तवता, प्रामाण्य, औचित्य व उपयुक्तता ज्या वाङ्मयांत असते तेंच असली झळ पचवून व जिरवून टिकूं शकतें हें उघड आहे. मोपासाँच्या लघुकथा-महासागरांतही कांहीं अक्राळ विक्राळ नक्र आहेत, तसेच पुष्कळच पोंवळ्यांचे खडक व मोत्यांचे शिंपलेही आहेत. मीं त्यांतील कांहीं मोतीं-पोंवळीं वेंचून तीं ह्या कथासंग्रहांतून समाजासमोर ठेवलीं असल्यानें सर्वांनाच त्यांचें कौतुक करावेंसें वाटेल अशी मला दृढ आशा आहे.

ह्या कथासंग्रहांत बहुसंख्या मोपासाँच्या गोष्टींची असून बाकीच्या माझ्या आहेत. त्याविषयीं मीं कांहींच न बोलणें चांगलें. तथापि समाजांतील जीवनार्थ-कलहाचीं वास्तविक हृदयस्पर्शी आन्दोलनें व पडसाद बहुशः प्रत्येक गोष्टींत उमटलेले वाचकांना ऐकावयाला येतील अशी मला खात्री आहे.

यापुढील कथासंग्रहांत मी केवळ 'मोपासाँच्या गोष्टी' कसोशीनें निवडून त्यांचें रूपान्तर करून त्या प्रसिद्ध करणार आहे. तो संग्रहही लौकरच वाचकांच्या हातीं पडेल.

आदर्श वाङ्मय प्रकाशन,
पुणें २, ता. १-२-३७.

विठ्ठल वामन हडप

# कथानुक्रम

# अंजन

सिनेमाहून माघारीं आल्यावर संपतराव आपले कपडे उतरूं लागले. तेवढ्यांत सुलक्षणा आंत आली ती थेट आरसे-कपाटापाशीं गेली; व आरशांत आपलें रूप पाहून आपल्या विलासी चर्येला आणखी नीटनेटकेपणा आणूं लागली. संपतरावांनीं पायांतील बूट उतरून ठेवतां ठेवतां आपल्या पत्नीच्या त्या ढंगाकडे पाहिलें; तेव्हां अंतःकरणाला मुंगी चावल्यासारखा भास त्यांना झाला. चैन तर पडेना व मुंगी तर सांपडेना; पत्नीच्या बाबतींत कांहीं बोलल्याखेरीज राहवेना व बोलण्याचा धीर तर होईना !

अखेर एकदांचा त्यांनीं आपल्या मनाचा धीर केला व सुलक्षणेला म्हटलें, "आज तुझ्या उच्छृंखलपणाला जणुं पौर्णिमेची भरती आली होती."

सुलक्षणेनें क्षणभर स्मितहास्यपूर्वक केंस सांवरीत एकवार तिरप्या नजरेनें आपल्या पतीकडे पाहिलें. त्या पाहण्यांत पश्चात्तापाची छटादेखील नसून विजयोन्मादाची गोड पण झगझगीत लकेर होती.

नेसलेलें रेशमी तलम पातळ सोडून आपल्या नेहमींच्या संवईप्रमाणें रात्रीचें शुभ्र तलम पातळ पेहेरीत सुलक्षणा म्हणाली, "रसिकपणाला व खेळकरपणाला तुम्ही जर उच्छृंखलपणा म्हणणार असाल तर मग बोलणेंच खुंटलें."

"त्यामुळें मला खालीं पाहण्याची वेळ आली." संपतराव भुंवया चढवीत नापसंतीच्या नजरेनें पहात म्हणाले.

"हा नेपथ्यपाठ तुम्ही मला देत आहां कीं काय ?" सुलक्षणेनें नवऱ्यावर तिरस्कारपूर्वक भुंवया रोखीत अंगांतला पोलका काढतां काढतां विचारलें, "माझ्या वर्तनावर तुम्हाला टीका करायची आहे कीं काय ?"

" तसेंच केवळ नव्हे; पण मनोहर तुझ्याशीं इतक्या घसणीनें बोलत चालत होता, तें सर्व सभ्यतेची मर्यादा सोडून चाललें होतें. तसला चवचालपणा जेथल्या तेथें थांबवावा असेंहि एकदां माझ्या मनांत आलें होतें."

" कां ? कां ? असें कां ? तुमच्या डोक्यांत असले नामर्दपणाचे विचार घोळण्याचें कारण काय बरें ? मला वाटतें, गेल्या एका वर्षापासून तुम्ही स्त्रीपुरुषांच्या वर्तणुकीच्या बाबतींत आपले विचार बदलले असावेत. एका वर्षापूर्वी माझ्याशीं कोणता तरुण घसणीनें वागतो व कोणता वागत नाहीं याचा विचारहि कधीं तुमच्या डोक्यांत घोळत नसे. आतां वेळच आली म्हणून आठवण देत्यें मी,— तुम्ही एका प्रिय पात्राच्या प्रेमपाशांत सांपडलां आहां व तिच्यावर तुमचें जीवश्च कंठश्च प्रेम आहे असें मला कळल्यावर मी तुम्हाला त्याचा जाब विचारला नव्हता का ? मी कांहीं तेव्हां पुराव्याखेरीज बोलत नव्हत्यें. तुमच्या तेव्हांच्या वर्तणुकीनें मला खरोखरच अत्यंत दुःख होत असे. तेव्हां तुम्हीं मला काय उत्तर दिलें त्याची आठवण करा बरें ! आठवतें का ? दोन बुद्धिमान व एक सुजाण स्त्रीपुरुषांतील लग्नसंबंध हा निव्वळ भागीदारीचा असतो; एक सोईस्कर सामाजिक बंधन याखेरीज लग्नाचें कांहींच महत्त्व नाहीं; नैतिकदृष्ट्या लग्नाचा कोणी विचारहि करण्याचें कारण नाहीं, असें सांगून मला माझ्या मर्जीप्रमाणें वागायला मोकळीक आहे असें तुम्हीच म्हणालां होतां ना ? तुम्ही आणखी असेंहि म्हणालां होतां कीं आपली ती मैत्रीण माझ्यापेक्षां जास्त मोहक, जास्त सुंदर व शालीन होती. अर्थात् हें सर्व तुम्ही अगदीं खरें खरें बोललां, माझ्या मनाची व मतांची पर्वा करण्याची आवश्यकता तुम्हांला भासली नाहीं; हें सर्व निसर्गाला धरूनच झालें असें मी म्हणतें. पण मी आतां त्या तुमच्या बोलांचा यथावत् अर्थ ध्यानीं घेऊन वागल्यें तर ती माझी चूक का ? "

क्षणभर उसंत घेऊन ती म्हणाली, " त्याच वेळीं आम्हीं एकाच घरांत पण एकमेकांपासून विभक्त राहण्याचें ठरविलें होतें. तेव्हां आपल्याला एक मूल झालें असल्यानें जगाच्या तोंडाला हात लावण्यासाठीं तरी आम्हांला उघड उघड विभक्त राहतां येणें शक्य नव्हतें. तथापि तुम्हीच तेव्हां आपल्या प्रेमचेष्टांचें समर्थन करण्यासाठीं मला सांगितलें होतें कीं—मी स्वतंत्रपणें

एखादा प्रियकर शोधून काढून त्याच्याशीं सुखांत काळ घालविला तरी आपली त्याला कांहीं हरकत नव्हती. त्या माझ्या विवाहबाह्य प्रेमसंबंधाचा बोभाटा होऊं नये एवढी खबरदारी फक्त मीं घ्यावी, असें तुम्हीं मला सांगितलें होतें. अशा परिस्थितींत बायका किती चतुराईनें वागूं शकतात याचें रसाळ वर्णनहि तुम्हीं तेव्हां माझ्याशीं केलें होतें. आठवा पाहूं तो काळ! रंभा तेव्हां आपला जीव कीं प्राण होऊन बसली होती. इतकीं कीं, पति-पत्नी या नात्यानें निसर्गतः सुखाची घटका उपभोगावी असें माझ्या मनांत आलें व मी आपल्याला एखादी रात्र तरी घरीं रहा असें सांगितलें, अथवा बरोबर सिनेमाला, नाटकाला—निदान फिरायला जाऊं असं मी आशेला येऊन म्हणालें तर तुम्ही नापसंती दर्शवावी. तुमच्या सुखांत मी मीठ कालवीत आहें असें तुम्हांला वाटावें. परंतु तेव्हांपासून पुढें आपण अगदीं सुखांत एकाच घरांत खरोखर विभक्त परंतु जगाला दिसायला एकत्र अशीं राहिलों नाहीं का? गोष्ट खरी आहे; समाजांत जातांना आपण पति-पत्नी या नात्यानं जातों. परंतु घरांत? घरांत कोणाचा कोणाशीं कांहीं संबंध अथवा एकमेकांविषयीं मत्सर बाळगण्याचं खरोखर कांहीं कारण आहे का? असं असतां अलीकडे गेल्या एकदोन महिन्यांपासून मी पाहतें आहें, तुम्ही माझ्याकडे मत्सरबुद्धीनें पाहूं लागलां आहां; याचा अर्थ काय हेंच मला कळत नाहीं!"

"मी तुझ्याकडे मत्सरबुद्धीनें पाहात नाहीं वेडे! पण मला एवढेंच भय वाटतें कीं तूं तरुण व भावनाप्रधान आहेस; समाजांत तुझ्या वागणुकीमुळें भलतेच गैरसमज उत्पन्न व्हायचे!"

"मला हंसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं या तुमच्या बोलण्यावर. ही कसोटी कोणीं तुमच्या वर्तनाला लावली तर त्या कसोटीस आपलें वर्तन कितपत उतरेल याचा अगोदर विचार करा. असलं पोकळ दांभिक पांडित्य तुम्हीं माझ्यासमोर करायलाच नको होतं."

"हं, अशी हंशावारी नेण्यासारखी ही गोष्ट नाहीं सुलक्षणे. तुझा पति म्हणून नव्हे, तर जिव्हाळ्याचा मित्र या नात्यानें मी हें बोलत आहें. माझ्या बाबतींत तूं केलेल्या विधानांविषयीं बोलायचें तर तीं अतिशयोक्तींचीं आहेत."

"नाहीं; मुळींच नाहीं. तुमचा रंभेच्या ठायीं जडलेला लोभ मला जेव्हां आढळून आला, आणि तुम्हींहि माझ्यापाशीं तें कबूल केलें, तेव्हां मी असें गृहीत धरलें कीं तुम्हीं मलादेखील तुमच्याप्रमाणेंच वागायला मोकळीक द्यायला अर्थातच तयार आहां!"

"माझें जरा ऐकून घे—"

"असा मध्येंच मला अडथळा करूं नका. तुम्ही बोलत असतांना मीं तुम्हांला असा अडथळा केला का? अजून मला माझ्या मनाजोगा प्रियकर मिळालेला नाहीं; मी त्याच्या शोधांत मात्र आहें. मला त्याची फार आवश्यकताहि आहे. प्रश्न इतकाच आहे कीं तो प्रियकर तुमच्यापेक्षां जास्त मनोवेधक असला पाहिजे. मी काय म्हणत्यें ऐका! मी तुमचा हा गौरव करीत आहें; पण तो तुम्हांला रुचत असल्यानें तुमच्या चर्येवरून दिसत नाहीं."

"असली थट्टा करण्याची ही वेळ खास नव्हे."

"पण मी ही थट्टा करीतच नाहीं मुळीं. मी अगदीं मनापासून बोलत्यें आहें. एका वर्षापूर्वी तुम्ही काय बोललां तें मला अक्षरशः आज आठवतें आहे. आतां फक्त माझ्या मनाजोगी संधि येण्याचा अवकाश आहे. ती आली, कीं मग तुम्हाला आवडो अथवा न आवडो, मी—मी माझ्या नव्या प्रियकराची व्हायला कमी करणार नाहीं! मी तें सारें तुमच्या ध्यानीं न येतां करीन. मला माहीत आहे; किती तरी बायका अशाच वागतात."

"आपल्या स्त्री-जातीची अशी निंदा तूं कोणत्या आधारावर करतेस?"

"कोणत्या आधारावर करत्यें? महाशय, आपला नवरा आपल्या वर्तनाविषयीं मुळींच संशय घेत नाहीं असें रंभेनें हंसत हंसत तुम्हाला सांगितलें, तेव्हां मनापासून हंसणारे तुम्हीच ना?"

"तें असेना कां? पण केवळ तेवढ्यावरून असें हंसणें तुला शोभत नाहीं."

"बरोबर आहे; रंभेच्या पतीवर प्रसंग होता तेव्हां तुम्हीं तसल्या गोष्टींनीं स्वतःची करमणूक करून घेतली. पण स्वतः तुमच्यावर बाजू आली तेव्हां मात्र अशी टंगळमंगळ काय? वाः! काय विचित्र माणूस आहां तुम्ही! परंतु असल्या गोष्टी बोलून वाचा विटाळ करण्याची माझी इच्छा

नाहीं. मीं केवळ तुमच्या मनाची तेवढी तयारी आहे कीं नाहीं हेंच पाहिलें— ”

“ मनाची तयारी ? ती कशाबद्दल ? ”

“ मनाची तयारी स्वतःला फसवून घेण्याची. जेव्हां मनुष्याला अशा गोष्टी ऐकून राग येतो, तेव्हां त्या गोष्टी सहन करण्याची त्याच्या मनाची तयारी नाहीं असें समजावें. माझी अशी अटकळ होती कीं दोन महिन्यांच्या आंत अशी फसगत झालेल्या एका नवऱ्याची गोष्ट तुम्हांला मीं सांगावी आणि ती ऐकून तुम्ही पोट धरून हंसावें. विशेषतः स्वतः तुमच्यावर तसा प्रसंग आल्यावर तुम्हाला काय वाटतें हें पहाण्यांत खरी मौज आहे. ”

“ खरोखर, आज तूं अगदीं एखाद्या मार्थेफिरूसारखी बेपर्वाईनें वागत आहेस; अशा स्थितींत तुला मी यापूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. ”

“ खरें आहे. माझ्या स्वभावांत तितका बदल झाला आहे, व तो प्रशंसनीय नाहीं हेंहि खरें. पण तो अपराध माझा नसून तो तुमचा आहे. ”

“ तें राहूं दे लाडके ! आपण यापेक्षां जबाबदारी ओळखून आतां बोलावें व वागावें हें चांगलें. माझी तुला अशी विनंति आहे कीं वृंदावनाशीं तूं यापुढें तरी इतकी घसण ठेवूं नकोस. ”

“ तुम्हांला आमचा मत्सर वाटतो; मी ओळखतें. ”

“ नाहीं—नाहीं; पण मी स्वतःला समाजांत थट्टेचा विषय करून घेऊं इच्छित नाहीं. यापुढें जर वृंदावनानें आजच्याप्रमाणें लाघवी नजरेनें तुझ्याकडे पाहतांना अथवा लाघवी भाषेंत तुझ्याशीं बोलतांना मीं पाहिलें तर त्याला तिथल्या तिथें लाथेखालीं तुडवायला कमी करणार नाहीं. ”

“ तुमचें माझ्यावर प्रेम असेल तर हें शक्य तरी आहे का ? ”

“ कां ? शक्य कां नाहीं ? खरोखर, तशी वेळ आली तर मी असला कोणताहि कडक उपाय योजायला कमी करणार नाहीं. ”

“ ठीक आहे. मी तुमची याबद्दल फार आभारी आहें. परंतु मला सांगायला वाईट वाटतें कीं माझें तुमच्यावर मुळींच प्रेम नाहीं. ”

संपतराव लगेच खुर्चीवरून उठले, व तेथल्या तेथें एकदोन येरझारा

घातल्यावर सुलक्षणेपाशीं जाऊन त्यानीं तिचें उभ्या उभ्या चुंबन घेतलें. ती तिडकेसरशी बाजूला सरकून तीक्ष्ण दृष्टीनें त्यांच्याकडे पाहात म्हणाली, " तुमच्यानें असें धाडस करवलें तरी कसें ? ध्यानीं आणा, तुमचा व माझा आतां कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. आपण एकमेकांना अगदीं परकीं आहों. "

" कृपा करून आतां आणखी महामायेसारखा थैमान घालूं नकोस. आज तू मला इतकी सुंदर दिसतेस, कीं तुला पाहतांच माझं मन—"

" तर मग माझ्यांत आज फारच आश्चर्यकारक सुधारणा झाली असली पाहिजे. "

" तूं आज निःसंशय मोहक दिसतेस. तुझे हात व तुझे बाहु किती सुंदर दिसतात ! तुझी कातडीहि किती मृदु—"

" वृंदावनांना मी खात्रीनें रमवूं व नादीं लावूं शकेन ना ? "

" किती क्षुद्र मनाची आहेस तूं ! बाकी तुझ्यासारखी मोहक स्त्री मीं साऱ्या जन्मांत दुसरी पाहिली नाहीं. "

" अलीकडे तुमची उपासमार होत असावी. "

" म्हणजे काय ? "

" नाहीं, म्हटलें—अलीकडे तुमची फार उपासमार होत असावी ! "

" याचा अर्थ काय ? "

" मी म्हणत्यें तोच त्याचा अर्थ. गेल्या कांहीं दिवसांत तुम्हांला उपास घडले असावेत; त्यामुळें भुकेनें व्याकुळ झालेल्या विश्वामित्रासारखी तुमची अवस्था झाली असावी. मनुष्याला एरव्हीं जें अन्न कदान्नसें वाटतें तेंच भुकेल्या वेळीं मिष्टान्नाप्रमाणें रुचकर लागतें. मी कदान्नाचें ताट आहे. तथापि आज भुकेच्या वेळीं ह्या अन्नाचें सेवन करण्याची इच्छा तुम्हाला झाली आहे!"

" सुलक्षणे ! असलीं मर्मभेदक बोलणीं बोलायला तुला कुणीं शिकवलें ? "

" तुम्ही ! माझ्या माहितीप्रमाणें तुमच्या आजवर चार प्रियतमा होऊन गेल्या.—नटी, पांढरपेशांच्या सभ्य स्त्रिया, स्वच्छंदी स्त्रिया, वारांगना–अशा स्थितींत मी तुमच्या आजच्या लाघवाचा उपासमारीपेक्षां निराळा अर्थ लावूं तरी कसा ? "

" तूं मला बेदरकार म्हण, पशुवृत्तीचा म्हण; पण आज मी दुसऱ्यांदा तुझ्या प्रेमपाशांत गुरफटत आहें. "

" वाः ! एकूण तुम्ही...... "

" अगदीं बरोबर ! "

" आजच्या रात्रीं ? "

" होय, लाडके ! "

" ही पुन्हा तुम्हीं आत्मवंचना चालविली आहे. असें उपयोगी नाहीं. आपण जरा शान्त चित्तानें विचार करूं. आपण एकमेकांना परकीं अशीं स्त्री–पुरुषें आहों, नाहीं का ? मी तुमची पत्नी आहें हें खरें; पण मी स्वतंत्र आहें. मीं माझ्या प्रेमाचें धनीपण दुसऱ्या कोणाला तरी देण्याचें ठरविलें होतें. परंतु आतां तुम्ही इतकें म्हणता त्या अर्थीं तुमचा माझ्यावरचा पहिला हक्क मी कबूल करत्ये. पण तो एका अटीवर. तुमच्याकडूनहि मला त्याचा नाण्यांत मोबदला मिळाला पाहिजे! "

" तूं काय म्हणतेस तें मला समजलें नाहीं. "

" मी आणखी जरा स्पष्ट बोलत्यें. तुमच्या प्रियतमेइतकी मी सुंदर आहें का ? "

" तिच्यापेक्षां हजार पटींनीं तूं सुंदर आहेस! "

" सर्वांगसुंदर अशा स्त्रीपेक्षांहि सुंदर ? "

" होय. एकदां नव्हे, हजारदां ! "

" तीन महिन्यांत तिच्यासाठीं तुम्हाला किती झीज सोसावी लागली ? "

" याचा अर्थ तरी काय ? खरेंच, मला सांग तरी एकदां ! "

" माझ्या विचारण्याचा अर्थ असा कीं, तुम्ही तुमच्या सुंदरांतल्या सुंदर व महागांतल्या महाग प्रियतमेसाठीं दागदागिने, कपडालत्ता, नाटक-सिनेमा वगैरे निमित्तांनीं तीन महिन्यांत किती पैसा खर्च केला ? "

" तें मला कसें सांगतां येणार ? "

" कां बरें ? सांगतां आलें पाहिजे. समजा, दरमहा सरसकट एक हजार रुपये सर्व मिळून ? "

" होय. अंदाज तेवढा खर्च झाला असेल. "

" तर मग माझ्या जिवाच्या जिवलगा ! मला एक हजार रुपये द्या, म्हणजे आजच्या रात्रीपासून एक महिनाभर मी तुमची आहें."

" सुलक्षणा ! तुझें डोकेंबिकें फिरलें आहे काय ? "

" तसें कांहीं नाहीं. पण तुमची तशी कल्पना असेल तर असो. आतां मला झोंपायला जाऊं द्या." असें म्हणून सुलक्षणा त्याच पावलीं आपल्या विश्रान्तिमंदिरांत गेली. दरवाजा उघडाच राहिला, त्यामुळें आंतील सुगंध बाहेरहि दरवळूं लागला. सुगंधाला नागदेखील भुलतो, मग संपतराव तर काय मनुष्य ! तो आधींच सुलक्षणेच्या ठायीं आसक्त झालेला, तशांत तिच्या विरोधानें त्याची उत्सुकता अधिकच वाढीला लागलेली. पुष्पलतेकडे मोहानें जाणाऱ्या नागासारखा तो सुलक्षणेच्या विश्रान्तिमंदिराच्या दरवाजांत जाऊन उभा राहिला.

"इथें किती मधुर सुगंध येतो आहे!" ओघानेंच संपतरावाच्या मुखावाटे उद्गार निघाले.

" तुम्हांला तसें वाटतें का ? मी नेहमीं 'अगरू' वापरतें. त्याखेरीज दुसरा सेंट कधींच वापरीत नाहीं."

" मी नेहमीं महिंद्रकर ब्रदर्सकडील कपडेच घेऊन वापरतों, त्यांतलाच तुझा हा निर्धार दिसतो. बाकी तयार कपड्यांत हिंदुस्थानांतील हिंदी व्यापारी महिंद्रकर, तसा—"

" हो ! तसाच माझा अगरू आहे. तुम्हांला तो आवडला ना ? "

" किती आवडला म्हणून सांगूं ! "

" बरें; आतां कृपा करून झोंपायला जा ना एकदांचे ! मला झोंप येते आहे."

"सुलक्षणा !"

"तुम्ही जाण्याची कृपा करणार नाहीं का ?"

जाण्याचें बाजूलाच राहिलें; संपतराव उलट आंत गेला व तेथल्या एका कोचावर आरामशीर बसला.

सुलक्षणा तें पाहून म्हणाली, "तुम्ही जात नाहीं अं ? बरें आहे तर."

तिनें अधिक कांहीं न बोलतां अंगांतील अगदीं अंगाबरोबरची झिर-

झिरीत रेशमी चोळी काढली. व केंस अंमळ मोकळे करण्यासाठीं दोन्ही हात मस्तकाकडे नेले.

संपतराव कोचावरून उठला व तिच्याजवळ गेला.

" माझ्याजवळ येऊं नका. नाहींपेक्षां मला राग येईल; मी सांगून ठेवत्यें तुम्हांला. मला हें खपायचें नाहीं. ऐकतां ना ? "

त्यानें आपल्या बाहुपाशांत कवटाळून तिचें चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. तिनें टेबलावरील गुलाबपाण्याची बाटली घेऊन एका पेल्यांत त्यांतलें पाणी ओतलें व त्याच्या मुखावर फेंकलें.

त्याला मनस्वी संताप आला. तो दोन पावलें मागें सरकून म्हणाला, " किती आचरट आहेस तूं ! "

" असेनहि कदाचित्. पण माझी अट तुम्हांला माहीत आहे—एक हजार रुपये ! "

" किती चमत्कारिक बोललीस ? "

" कशी ? कृपा करून सांगा पाहूं ? "

" नवऱ्यानें आपल्या बायकोला तिच्या बायको होण्याबद्दल पैसे दिल्याचें उदाहरण घडलं आहे ? "

" किती मगरूरपणा तुमचा हा ! "

" मी मगरूर असेन; परंतु पुन्हा मी तुला सांगतों कीं नवऱ्यानें बायकोला तिच्या शरिराचें मोल देणें किती भयंकर—शुद्ध मूर्खपणाचें आहे ! "

" पण वेश्येला तिच्या शरिराचें मोल देणें हें त्यापेक्षांहि भयंकर नाहीं का ? तशांत घरी पत्नि असतां नवऱ्यानें तसें करणें या मूर्खपणाला तर तोडच नाहीं. "

सुलक्षणा आपल्या पलंगावर बसून पदरानें वारा घेतां घेतां बोलत होती. संपतराव पुन्हा तिच्याजवळ गेला व म्हणाला, " काय चमत्कारिक व हिडीस कल्पना तुझ्या डोक्यांत शिरली आहे ही सुलक्षणा ! "

" हिडिस कल्पना कशी ? "

" नाहीं तर काय ? माझ्याशीं एक हजार रुपये मागतेस ? "

" हिडीस? हिडीस का म्हणून? आम्ही परकीं माणसें नाहीं का? माझ्यावर तुमचें प्रेम आहे असें तुम्ही म्हणतां; फार चांगलें आहे. मी अगोदरपासूनच तुमची पत्नी असल्यानें तुम्ही माझ्याशीं लग्न करूं शकत नाहीं; त्या अर्थी मला विकत घ्या. इतर स्त्रियांना तुम्हीं विकत घेतलें नाहीं का? ते पैसे बेजबाबदारपणें उधळून टाकणाऱ्या दुसऱ्या एखाद्या स्त्रीला देण्यापेक्षां मला देणें अधिक चांगलें नाहीं का? स्वतःच्या लग्नाच्या बायकोला विकत घेण्यासारखी हृदयंगम कल्पना दुसरी कोणतीहि नसेल! तुमच्यासारख्या चतुर व बुद्धिवान् माणसाच्या ध्यानीं यांतील मौज तेव्हांच येईल. मनुष्याला एखाद्या वस्तूसाठीं भरमसाट आर्थिक मोल द्यावें लागल्याखेरीज त्याला त्या वस्तूविषयीं प्रेम वाटत नाहीं. तुम्ही असें केल्यानें आपल्या पतिपत्नीप्रेमांत नवजीवन ओतल्यासारखें होईल. तुमच्या बेकायदेशीर प्रेमसंबंधांशीं याची तुलना करून पहा बरें, हें किती हृदयंगम दिसतें तें! मी बरोबर नाहीं का?"

संपतराव क्षणभर गोंधळल्यासारखा झाला. त्याला अंमळ रागहि आला. लगेच त्यानें आपल्या खिशांत हात घालून हजाराहजारांच्या दोन नोटा काढल्या व सुलक्षणेपुढें ठेवून म्हटलें, " हे घे एक हजाराऐवजीं दोन हजार रुपये. पण एक भुता! एवढें मात्र ध्यानीं ठेव—"

" काय?"

" असली भलती चटक स्वतःला लावून घेऊं नकोस."

" कां?"

" तूं वेश्या आहेस का?"

" म्हणजे तुम्ही वेश्येला लग्नाच्या बायकोपेक्षां थोर मानतां असाच ना याचा अर्थ? मला सांगा, वेश्येला तुम्ही मोल कां देतां? मोलाची ती वाटते म्हणून ना? आणि बायको मात्र तुम्हांला फुकटची वाटते नाहीं का?"

" पुन्हां तेंच! तूं लग्नाची बायको असून वेश्येची स्वतःशीं बरोबरी करतेस? लग्नाच्या बायकोला पतीचें नांव धारण करण्याचा, समाजांत पतीच्या बरोबरीनें मान्यता मिळविण्याचा अधिकार आहे; म्हणूनच त्यांना समाजांत मान आहे.—"

" पण लग्नाच्या बायकांना मान देणारा समाज हा तुमच्यासारख्याच पुरुषांचा ना, की जे पुरुष घरांतल्या लग्नाच्या बायकांना पायपुसण्याप्रमाणें लेखून वेश्यांच्या व बिनलग्नाच्या स्त्रियांच्या चरणीं मात्र अलोट पैसे ओतून वर लोटांगण घेतात ? मग मला सांगा, प्रतिष्ठित समाज जर तुमच्यासारख्या लोकांचाच, तर त्यांच्यापाशीं म्हणजे समाजांत खरा मान लग्नाच्या बायकापेक्षां बिनलग्नाच्या बायकांना व वेश्यांनाच नाहीं का ? आतां स्पष्टच विचारत्यें, मानमान्यतेची धूळ तुम्ही पुरुष आम्हां स्त्रियांच्या डोळ्यांत फेकून आम्हांला आपल्या कायमच्या गुलाम करून ठेवूं पाहतां. पण असली पोकळ मानमान्यता काय जाळायची आहे ? मला लग्नाच्या बायकोला आपल्याच भापेनें एवढी मान्यता असती, तर मला दूर लोटून वेश्येच्या भजनीं लागणें तुम्हांला कां रुचलें असतें ? तुमच्याच वर्तनानें सिद्ध झालें आहे कीं लग्नाच्या बायकोची किंमत वेश्येपेक्षां कमी आहे. ती समाजाच्या मर्यादा सांभाळून शक्य तितकी स्वतःची किंमत वाढवून घेण्यासाठींच मी ही नवी अट घातली आहे. ती तुम्हीं पाळलीच पाहिजे. "

" ती कशी काय पाळायची ? "

ती मनापासून हंसत म्हणाली, " एक हजार रुपये प्रत्येक महिन्याला मिळाले पाहिजेत. नाहींपेक्षां मी तुम्हाला तुमच्या सिनेमानटींकडे पाठवून देईन. माझ्याठायीं समाधानवृत्तीनें राहण्याची तुमची इच्छा असली तर मी आणखी मागेन ! "

# पातकी कोण ?

" उल्ला ! खाऊ उल्ला ! "

तो वसंतऋतूंतील ताज्या पालवीसारखा कोंवळा, चैत्रवैशाखांतील पौर्णिमेच्या चांदण्यासारखा शीतळ, पण अनेकांचीं मनें आपणाकडे एकदम खेंचून घेणारा बोबडा बाळआवाज माझ्या कानीं पडला मात्र; आणि मीं लगेच हातांतील पुस्तक मिटतां मिटतां त्या अनुरोधानें डावीकडे पाहिलें.

तो आवाज एका लहान--सुमारें तीन वर्षांच्या बालिकेचा होता. मी बोरीबंदरावर गाडींत बसलों, तेव्हांपासून मी वाचनांत इतका गढून गेलों होतों कीं, माझ्यापूर्वीं त्या डब्यांत कोणकोण माणसें होतीं व माझ्यानंतर कोण कोण आलीं, याची मला दाद नव्हती. माझ्या बाकांवर डाव्या बाजूला कोणीतरी एक उतारू येऊन बसला, एवढें मला आभासानें व नंतर स्पर्शानें कळलें. पण तो मनुष्य कोण आहे, हें वर मान करून पाहण्याची इच्छा मात्र मला झाली नाहीं. फार काय, गाडी बोरीबंदरावरून धाड् धाड् धांवत केव्हां सुटली व भायखळ्यावर केव्हां येऊन उभी राहिली हें देखील माझ्या ध्यानीं आलें नाहीं. इतकी माझी वाचनांत तंद्री लागली होती.

पण इतक्या खडखडाटानें व गलबलाटानेंहि ज्या तंद्रीचा भंग झाला नाहीं; तिचा भंग त्या कोंवळ्या पांखराच्या कोंवळ्या किलकिलाटानें झाला. त्या लेंकराच्या बोबड्या बोलांनीं मला भानावर आणलें. आणि आश्चर्य हें कीं, एरव्हीं मी जो असा अकस्मात् एकांताचा भंग झाल्यामुळें स्वतःवर व सभोंवारच्या जगावरही चिडावयाचा तो--पहाटेला झोंप पूर्ण झाल्यावर आपण प्रफुल्ल वृत्तीनें जागे होत नाहीं का ?--तितक्या प्रसन्न वृत्तीनें त्या बालिकेकडे पाहूं लागलों.

लहान मुलें परमेश्वराचे अवतार होत असें देवभोळे लोक म्हणतात तें

खोटें नव्हे. माझा जरी परमेश्वरावर भरंवसा नाहीं, तरी अशा सुंदर बाळांचें कौतुक मला कसें वाटणार नाहीं ?

बागेंत हिरव्या चांफ्याचें एकच फूल ताटव्यावर फुललें असलें तरी त्याचा सुवास बागभर दरवळत असतो व कैकांच्या चित्ताला सुखावतो, तसे त्या डब्यांतले सर्व लोक माझ्याप्रमाणेंच त्या बालिकेकडे पाहात होते, तिच्या बाळलीला पाहून आनंदित होत होते.

मींही तें फूल पाहिलें, त्याप्रमाणेंच ज्या वेलीवर तें फूल फुललें होतें ती वेलही पाहिली व ती वेल ज्या वृक्षावर आधारली होती तो वृक्षही पाहिला. त्या मुलीची आई मुलीसमोर बांकावर बसली होती; व त्यांचा आधार एक तरुण गाडीच्या खिडकीला धरून प्लॅटफॉर्मवर उभा राहून त्या मुलीशीं बोबड्या भाषेंत कांहींतरी बोलत होता. मुलीची आई पाहिली, ती सुमारें अठरा एकोणीस वर्षांची तरुण स्त्री होती. वर्णानें निमगोरी, चर्येनें हंसतमुख व एकशिवडी अंगकाठीची ती होती. ती सुंदर कांहीं फारशी नव्हती; नाकाडोळ्यानीं नीटस होती इतकेंच, पण शेंदुराच्या शेंदरी रंगाच्या सौंदर्यापेक्षा कस्तुरीचा कृष्णवर्णी कुरूपपणा देखील आपणाला मानवतो—आवडतो तो का ? सौगंधिक पावित्र्य कस्तूरीच्या ठायीं असतें म्हणूनच ना ?

झालें तर. त्या तरुण स्त्रीच्या नीटस रूपांत कस्तूरीची पवित्र मोहकता होती.

खिडकीला आधारून उभा असलेला त्या वेलीचा आधारदेखील वेलीला व फुलाला शोभण्याजोगा होता. त्या मायलेकींचा तो कोण हें जरी मला माहीत नव्हतें, तरी त्यानें त्या मायलेकींवर धरलेली मायेची पांखरछाया मला दिसली. त्या मुलीचा तोंडवळा जरी आईसारखा बहुतांशीं होता, तरी ती त्याच गृहस्थाची मुलगी असावी, हें कोणालाही रुपसादृश्यावरून व तारतम्यज्ञानावरूनही ओळखतां येण्याजोगें होतें.

त्या मुलीची व तिच्या आईची वेशभूषा, त्या गृहस्थाचा पेहराव, वगैरे-वरून तें एक मध्यम स्थितींतील कुटुंब असावें हें मीं ताडलें. ती मुलगी आईसमोरच बांकावर एका वयस्क व मोलकरणीसारखी दिसणाऱ्या स्त्रीच्या मांडीवर बसली होती. गाडीबाहेर खिडकीच्या शेजारीं त्या गृहस्थाच्या मागें पांच सहा गिरणीमजूर व त्यांतल्याच एकदोन बायका उभ्या होत्या. ती

बाहेरची सारी मंडळी अर्थातच त्या कुटुंबाची शेजारी असावी; व ती त्या मायलेकींना पोंचविण्यासाठीं आली असावी.

मी कितीतरी वेळा टक लावून तें दृश्य पाहात होतों. एका सरांत ओंवलेल्या तीन मोत्यासारखें तें लहानसें कुटुंब मला दिसत होतें. बालिका त्या दुसऱ्या बाईच्या मांडीवर बसून डब्यातील सभोंवारचा देखावा पहात होती. तिची आई मधून मधून मुलीकडे आणि त्या गृहस्थाकडे पाही, व लज्जाविनय-संपन्न आर्यमहिलेला शोभण्याजोगें स्मित मधून मधून करी.

" बाबा ! नीट जा बरें का ? रडूं नकोस." तो गृहस्थ मुलीला म्हणाला. तें त्या मुलीचें लाडकें टोपणनांव असावें.

पण मुलीचें लक्ष्य तिकडे कुठें होतें ! ती डब्यांत सभोंवार पाहात होती.

" सुशे ! तुला कोंण हांक मारतंय पहा ! " मुलीला सांभाळणारी वयस्क बाई मुलीच्या हनुवटीखालीं हात देऊन तिचें मुख वर करून तिच्याकडे पहात हंसत हंसत म्हणाली.

तरीही सुशी आपल्यांतच दंग ! परक्यांशीं परकेपण व नातेवाईकांकडे ओढा, असला व्यवहारचातुर्याचा दुजा भाव शहाण्यासुरत्या मोठ्या माणसाना होय. निर्व्याज बालकाना त्याचें काय होय ? बरें; सुशी सभोंवारच्या अमुक एकाच गोष्टीकडे टक लावून पाहात होती असेंही नाहीं. माणसाची सभोंवार पुष्कळच गर्दी होती. त्यात कितीएक नीटनेटके पुरुष व तशाच कांहीं स्त्रिया होत्या, कुरूप माणसेंही होतीं, तरणीं होतीं तशींच म्हातारीही होतीं, झकपक कपडे केलेलीं कांहीं होतीं तशींच मळकट कपड्याचीं व कळकट चेहऱ्यांचींही होतीं. बरेचसे लोक सभोंवतालच्या सौंदर्याकडे तेवढे पहात होते. त्यापैकीं अनेकांच्या —अर्थात् पुरुषांच्या नजरा त्या प्रेमळ मायलेकरावर—कीं सुशीच्या आईवर नकळे—खिळलेल्या होत्या. पण सुशीसमोर एक मळकट कपडे पेहेरलेली दिसणारी पिंजारलेल्या केंसाची गरीब म्हातारी उभी होती, ती सुशीकडे व सुशी तिच्याकडे मधून मधून टक लावून पहात होती. सभोंवारचे लोक त्या म्हातारीचा तिरस्कार करीत होते.

एकजण म्हणाला, " ए म्हातारे ! इथें जागा नाहीं. दुसऱ्या डब्यांत जा."

दुसरा म्हणाला, " बायकांच्या डब्यांत जागा आहे. तिकडे जा."

तिसरा म्हणाला, " ह्या भिकाऱ्यांनीं अगदीं भंडावून सोडलें आहे बुवा!"

जवळपासचे लोक म्हातारीकडे पाहून नाक मुरडून अंगावर शहारे उठल्यासारखें करीत; येणारे जाणारे लोक तिचा आपणाला स्पर्श होऊं नये म्हणून दरडावून तिला बाजूला व्हावयाला सांगत, व अगदीं अंग चोरून जात येत. म्हातारी उभी होती, तिच्या शेजारचा एक बांक तीन माणसांचा होता. त्या बांकावर एक तरुण व एक तरुणी अशीं दोघें बसलीं होतीं. पण तिसऱ्या जागेवर त्यांनीं आपली वळकटी ठेवली होती, ती काढून त्यांनीं म्हातारीला जागा कांहीं करून दिली नाहीं.

बिचारी अनाथ अपंग म्हातारी ती! म्हणूनच ती सारी गैरसोय व उपहास निरुपायाच्या शांतपणानें सहन करीत होती. तिचा तिटकारा न करणारी अशी एकटी लहानगी सुशीच काय ती तिला त्या व्यायशीं माणसांच्या डब्यांत आढळली म्हणून कीं काय, ती सुशीकडे एकटीकडे पाहून हंसत होती. सुशीदेखील तिच्याकडेच पाहून हंसत खिदळत पांखरासारखी बोबडी किलबिल करीत होती.

सुशीची आई तेव्हां कां नकळे, किंचित् गोंधळल्यासारखी झाली होती.

— २ —

इतक्यांत गाडी सुटण्याची शीळ झाली.

सुशीच्या आईनें खिडकींत उभा असलेल्या गृहस्थाकडे पाहिलें. पोंचवायला आलेले लोक अखेरचा निरोप घेऊं लागले.

" बाबा! नीट सांभाळून जा हां! " तो गृहस्थ सुशीला म्हणाला. सुशीनें त्याच्याकडे पाहिलेंही नाहीं. ती म्हातारीशीं हंसण्याखिदळण्यांत दंग होती.

" सुशे! बाबा काय म्हणतात ऐकलेंस का? " सुशीला सांभाळणाऱ्या बाईनें सुशीचें तोंड त्या गृहस्थाकडे वळवून हातानें खुणावलें. सुशीनें नुसतें तिकडे पाहिलें.

गाडी सुटली. तो गृहस्थ त्या बाईला म्हणाला, " धोंडूबाई, यांना नीट सांभाळून न्या बरं! अगोदर सुशीला तिच्या आजोळीं पोंचवा आणि मग घरीं जा. "

" त्याची काळजी नको. तुम्हांला " धोंडूबाई म्हणाली.

गाडीचा वेग वाढूं लागला. तो गृहस्थ जागींच उभा राहून धांवत्या गाडींतील सुशीकडे पाहून हातरुमाल उडवीत होता. त्या हातरुमालांत त्या तरुणीसारखाच्याबद्दलचा जिव्हाळ्याचा संबंध होता. पण विनयामुळें तिनें त्याच्याकडे नुसतें एकवार ओझरतें पाहिलें, व तो तिच्याशीं बोलू शकला नाहीं तरी सुद्धां तो दाटल्या डोळ्यांनीं गाडी स्टेशनाबाहेर जाईतों त्या मायलेंकरांकडे पहात होता.

हां हां म्हणतां गाडी स्टेशनाबाहेर गेली. तीन सरी मोत्यांचा कंठा तुटून एक सर मोतीं गळून पडल्याचा भास मला झाला.

" माणसें जरा कुठं दूर जायला लागलीं म्हणजे यांचे डोळे नेहमीं असे पाण्यानें भरून येतात. " धोंडीबाई त्या तरुणीकडे पाहून म्हणाली.

ती तरुणी क्षणभर हंसली. पण दुसऱ्याच क्षणाला तिनें पदर डोळ्यांना लावला. सुमारें एका मिनिटानंतर तिनें पदरानें डोळे पुसून हंसत हंसत सुशीला हांक मारून जवळ घेतलें.

मायलेंकी वत्सलतेनें हंसूं खेळूं लागल्या. गाडी वेगानें चाललीच होती. म्हातारी जागींच उभी होती.

× × ×

दादर स्टेशन येतांच गाडी थांबली. भिकारीण उतरली. ती तरुण स्त्री बसली होती, तिच्या मागचा दोन माणसांचा बांक रिकामा झाला. तेवढ्यांत एक गोरागोमटा ऐटबाज व संपन्न तरुण आणि त्याच्या वयाला शोभणारी एक गोरीपान सुंदर तरुणी त्या डब्यात चढली, व दोघेही त्या रिकाम्या बाकावर बसलीं.

पण इतका संकोच आणि आडपडदा तरी कशाला ? तो तरुण माझ्या परिचयाचा होता. अनेकांचे पैसे कायदेशीरपणें लुबाडून वकिलीवर गब्बर झालेल्या ठाण्याच्या एका रंगेल वकिलाचा तो एकुलता एक बावीस वर्षांचा मुलगा होता. त्यानें पुण्यांत लक्ष्मीरोडवर एक कापडाचें दुकान पार्टीत चालविलें होतें. तो तरुण दिसावयाला सुंदर, शरीरानें गोंडस व रुबाबदार होता. प्रभाकर त्याचें नांव. तो रूपानें सुंदर व गर्भश्रीमंत होता; पण

वर्तनानें —पण कशाला हवी ती आठवण ! दर्शन घडतांच पापविमोचनार्थ स्नान करावें, या मासल्याचा तो एक समाजकंटक होता !

आणि ती त्याच्या बरोबरची सुंदर तरुणी त्याची भावी पत्नी होती. त्याचें नुकतेंच लग्न ठरलेलें मला माहीत होतें. पण लग्नापूर्वींच तीं दोघें माणुसकी सोडून वागूं लागल्याळें हा जांवई त्या मुलीच्या बापाच्या गळ्यांत पडल्याचेंही मीं ऐकलें होतें. त्या तरुणाचा चेहराही हें सारें बोलत होता.

माणसाचें सौंदर्य देखील पवित्र आणि मलिन असें निरनिराळ्या दोन प्रकारचें असतें ! चारित्र्यवान सुंदर स्त्री पाहिली कीं मनाला निर्व्याज आनंद होतो, व पूज्यभाव वाटूं लागतो. याच्या उलट कांहीं सुंदर स्त्रियांकडे पाहून मनांत भलतेच विकार उत्पन्न होतात. त्या विकारांना प्रेक्षकही आपापल्या परीनें कांहीं अंशीं जबाबदार असतील. पण सूर्याचा प्रकाश व चारित्र्याचें तेज झांकून झांकतां यावयाचें नाहीं हेंहीं तितकेंच खरें.

तीं दोघें एकमेकांना अगदीं बिलगून अशीं बसलीं होतीं कीं, तो देखावा पाहून कोणालाही 'कामातुराणां न भयं न लज्जा' हें सुभाषित आठवावें.

ती नवी तरुणी आपल्याच दिमाखांत दंग होती. डब्यांतील कांहीं लोक लोलुप दृष्टीनें तिच्याकडे पाहात होते. सार्वजनिक ठिकाणीं सुंदर स्त्रीकडे आशाळभूतपणें टक लावून पाहाण्याला कोणाला परवाना थोडाच लागतो ! तशांत त्या तरुणीचें अप्रतिम सौंदर्य सामान्य प्रेक्षकाच्या मनांत आदरापेक्षां अभिलाषच जास्त उत्पन्न करणारें होतें. तिथें लोकांचा काय दोष !

पण त्या नटव्या सुंदर तरुणाचें प्रथम समोंवार लक्ष्यच नव्हतें. तो समोरच्या बांकावर बसलेल्या सुशीच्या आईकडे डाव्या उजव्या बाजूनें वांकून पाहून आपली नेत्रपिपासा तृप्त करण्यासाठीं धडपडत होता.

सुंदर परस्त्री दिसली कीं तिच्याकडे पापी दृष्टीनें पाहावयाला चुकावयाचें नाहीं, हा त्या तरुणाचा नेहमीचा शिरस्ता असलेला मला माहीत होता. यावेळीं त्याची सुंदर भावी पत्नी जवळ असल्यानें त्या अडचणींतून त्याला मार्ग काढावयाचा होता.

पण तो मार्ग त्यानें काढला. सुशी बांकाला धरून उभी राहिली व त्या तरुणाकडे सहज पाहूं लागली, त्याबरोबर तो तिच्याशीं हसूं बोलूं लागला.

सुशी खिदळूं लागली तेव्हां तिच्याबरोबर तो अधिकच खिदळूं लागला.

सुशीला त्यानें उचलून घेतलें तेव्हां त्याचे हात तिच्या आईच्या अंगाला लागले. पण त्या स्पर्शांतील पाप त्या तरुण स्त्रीच्या पवित्र मनाला मुळींच जाणवलें नाहीं. उलट तिला आपल्या मुलीचें इतकें कौतुक कोणाचा कोण वाटेचा वाटसरू करीत असल्याबद्दल मनापासून आनंद वाटला.

असे दुर्जन जे असतात, त्यांना आपले दुष्ट मनोरथ साधण्यासाठीं लहान लेंकरांचा कसा उपयोग करून घ्यावा हें अगदीं सोळा आणे कळतें.

— ४ —

कल्याणपावेतों एका एकामागून एक स्टेशनें निघून जाईतों असाच प्रकार चालला होता. कल्याणवर धोंडीबाई पाण्याचा तांब्या भरून घेण्यासाठीं खालीं उतरली. तो तरुणही खालीं उतरला. धोंडीबाईला डब्यांत पान खातांना मीं पाहिलें होतें, तसेच त्या तरुणानेंही पाहिलें होतें. तीं दोघें खालीं उतरलीं तेव्हां मीही वर्तमानपत्र विकत घेण्यासाठीं खालीं उतरलों. तेव्हां मीं सहज पाहिलें, धोंडीबाई नळावरून तांब्या भरून आणीत असतांना तो तरुण घाईघाईनें पण सफाईनें तिच्या मागोमाग गेला.

“ तुम्हांला चहा घ्यायचा आहे का?” त्या तरुणानें धोंडीबाईला विचारलें.

“ कशाला हवा चहा आम्हां गरिबांना ? ” धोंडीबाई किंचित् हंसत म्हणाली. त्याचा अर्थ ‘हवा’ असाच होता.

“ चला माझ्या बरोबर.” तो तरुण म्हणाला.

मी वर्तमानपत्र घेऊन गाडींत चढलों, व कुतुहलानें त्या दोघांकडे दरवाजांतूनच पाहूं लागलों. त्या तरुणानें एक कप दूध आपल्या भावी पत्नीकडे पाठविलें. नंतर त्यानें चहा घेतला व धोंडीबाईलाही दिला.

चहा पितां पितां तीं दोघें कांहींतरी बोलत होतीं.

नंतर त्यानें धोंडीबाईला एक पानपट्टी विकत घेऊन दिली.

आणखी थोडा वेळ तीं दोघें कांहींतरी बोलत होतीं.

तोंच गाडी सुटण्याची शीळ झाली. त्याबरोबर तीं दोघेंही गाडींत चढलीं. मी माझ्या जागीं जाऊन बसलों.

गाडी चालू झाली. पुन्हा त्या तरुणाचा पूर्ववत् चारगटपणा सुरू झाला. सुशीच्या आईला त्या चारगटपणाची दादही नसेल. सभोवारच्या अपरिचित

माणसांच्या मनांतील पातकी हेतूंची तिला काय अथवा कोणाला काय, काय कल्पना असणार ?

थोड्या वेळानें खंडाळा स्टेशन आलें. सुशी व सुशीची आई यांना घेऊन धोंडीबाई खालीं उतरली. माझ्या शेजारचा उतारूही तेथेंच उतरला.

तो तरुण आपली जागा सोडून आला व माझ्या शेजारीं बसला, आणि ओळखीदेखीच्या भाषेत बोलूं लागला.

इकडचीं तिकडचीं कांहीं मामुली प्रश्नोत्तरें झाल्यावर तो मला म्हणाला, " खंडाळ्याला जी बाई उतरली, ती तुम्हांला कादंबरीला एक चांगला विषय आहे "

"कसा काय ?" मीं नाखुषीनें विचारलें. समाजांतील अशा देवमाणसांवर कोणीही शिंतोडे उडवलेले मला कधींच खपत नाहींत.

" ती पोरगी खंडाळ्याची रहाणारी. ती अगदीं पोरकी होती. ती वयांत आल्यावर एका शेजारच्या ओळखीच्या तरुणाशीं तिची ओळख झाली, व त्याच्याबरोबर ती मुंबईला पळून गेली." तो तरुण सांगूं लागला.

मीं खोचकपणे विचारलें, " पण मग तरी त्यानीं आपल्या आचरणावर लग्नाचें पांघरूण घातलें ना ?"

" नाहीं. त्यानीं लग्न मुळींच केलें नाहीं. ती जातीची भंडारीण व तो मराठा, त्यांचे लग्न कसें होणार ?"

" मग ती मुलगी..."

" ती त्याची बिनलग्नाची मुलगी आहे. तीं दोघेंही आतां नवराबायको-सारखीं रहातात, व लोकांना आपलें लग्न झालें असें सांगतात. पण तीं दोघेंही जातीबाहेर आहेत."

" हें तुम्हाला कसें कळलें ? "

" त्या दुसऱ्या बाईनें मला सांगितलें."

असें आमचें संभाषण होतें आहे, तोंच लोणावळा स्टेशन आलें. तिथें ती तरुण स्त्री खालीं उतरली. तो तरुण तिची बॅग खालीं उतरून देऊन तिच्या हातांत हात घालून गाडी सुटेतों तिच्याशीं हंसत खिदळत उभा होता.

× × ×

तोंच गाडी सुटण्याची शीळ झाली.

तो तरुण गाडींत चढतां चढतां त्या तरुणीला म्हणाला, " कदाचित् मी आणखी चार दिवसांनीं खंडाळ्याला माझ्या मित्राकडे चार दिवस जाईन. तिथें मला स्वतंत्र खोलीही मिळूं शकेल. तुला मी पत्र पाठवीनच. मग तूं येशील ना ?"

" म्हणजे ? माथेरानला जाण्याचा विचार होता ना ? " त्या तरुणीनें आश्चर्यपूर्वक विचारलें.

" खंडाळ्याहून मग आपण माथेरानला जाऊं." तो तरुण उत्तरला.

इतक्यांत गाडी वेगानें चालू झाली.

अंमळशानें त्या तरुणानें पुन्हा सुशीच्या आईचा विषय काढला. तो संभाषणाचा फापटपसारा सोडून थोडक्यात सांगावयाचें तर सुशीची आई ही एक ' बहकलेली तरुणी ' आहे हा त्याच्या भाषणाचा सारांश होता.

पुण्याला येतांच आम्हां दोघांच्या दोन वाटा दोन दिशांना फुटल्या. मी टांग्यातून घरी येताना स्वतःला विचारीत होतो, "याच्यासारख्या नादान तरुणाचा एकाएकीं खंडाळ्याला हवेसाठीं जाण्याचा बेत कां ठरावा ? घोडीबाईकडून त्यानें सुशीच्या आईचा ठावठिकाणा विचारून घेतला असेल काय ? "

सुशीची आई आणि तिचा मित्र यांच्यांतील जिव्हाळा पाहिल्यावर देखील तीं बिन् लग्नाचीं पतिपत्नी असलीं तरी त्यांना नांवें कोणीं कोणत्या तोंडानें ठेवावीं ? स्त्री–पुरुषाचा पतिपत्नीच्या नात्यानें एकमेकांवर अढळ विश्वास व अलोट प्रेम, हीच लग्नाची खरी फलश्रुति नव्हे काय ?

—आणि त्याच्या जोडीला चोरटेपणानें कामान्ध बनून वडील माणसांचीं देखील मनें दुखविणारी ती उल्लू जोडी ! या दोघांत पातकी कोण ?

# एका वेड्याची गोष्ट

आम्ही वेड्याच्या इस्पितळांतून बाहेर पडूं लागलों तोंच डाव्या बाजूच्या कोंपऱ्यांतील खोलीकडे माझें लक्ष गेलें. त्या खोलींत एक उंच पण सडपातळसा वेडा कांहीं हावभाव करून कोणातरी काल्पनिक कुत्र्याशीं बोलत होता. हळुवार स्वरांत तो हांक मारीत होता, " मने, मने, इकडे ये. चल लौकर इकडे ये." आणि असें बोलतांना त्यानें भुईवर हळूच पायही आपटला. आपण अनेकदां जनावराला हांक मारावयाची झाली तर असें करतों नाहीं का ?

मीं डॉक्टरांना विचारलें, " डॉक्टर, हा वेडा कोण हो ?"

" तो होय ! ती एक मजेदार गोष्ट आहे. तो मनुष्य गोपाळ या नांवाचा एक मोतद्दार आहे. त्यानें आपल्या कुत्र्याला नदींत बुडविलें; आणि तेव्हांपासून त्याला वेड लागलें आहे." डॉक्टर म्हणाले.

मी त्यांना म्हणालों, " ती गोष्ट मला सांगा तर खरी ! कधीं कधीं अगदीं साध्या गोष्टीही मनाला चटका लावून सोडतात."

× × ×

डॉक्टरांनीं गोष्ट सांगितली.

माहुलीला एक सुखी व श्रीमान कुटुंब रहात असे. घरांत संतति आणि संपत्ति यांना कसलीच उणीव नव्हती. घरची घोडागाडी असून गोपाळ हा त्यांचा मोतद्दार होता. गोपाळ अंतःकरणाचा प्रेमळ, सुस्वभावी व दिसावयाला उमदा होता.

एके दिवशीं तो आपल्या मालकाला सातार्‍याला पोंहोचवून माघारा येत असतांना अर्ध्या रस्त्यावर एक कुत्री त्याला भेटली, आणि ती त्याच्या गाडीमागोमाग येऊं लागली. गोपाळाचें प्रथम तिकडे लक्ष गेलें नाहीं,

परंतु ती कुत्री गाडीमागोमाग एकसारखी धांवत येत असतांना पाहून मात्र त्याचें सहज तिच्याकडे लक्ष गेलें. तें आपल्या ओळखीचें कुत्रें आहे कीं काय म्हणून त्यानें लक्षपूर्वक न्याहाळून पाहिलें, पण तसें कांहीं नव्हतें.

ती कुत्री म्हणजे केवळ कातड्यानें मढविलेला हाडांचा जिवंत सांपळा होता. तिचें ओटीपोट तेवढेंच काय तें हाडांना सोडून पोटापासून जरा खालीं लोंबत होतें. गोपाळानें मागें पाहतांच ती कुत्री क्षणभर उभी राहून आशेनें त्याच्याकडे पाहूं लागली व गोपाळानें गाडी उभी करतांच उभी राहिली. तेव्हां तिचें शेंपूट मागच्या दोन पायांत दडलेलें होतें आणि कान अगदीं डोक्याला चिकटलेले होते. अंमळशानें गोपाळाची गाडी चालूं लागल्याबरोबर ती कुत्रीही गाडीमागोमाग चालूं लागली. गोपाळानें तिला रागें भरून मागें परतविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण फुकट. तो जोरानें रागें भरला कीं त्या कुत्रीनें जागच्या जागींच शेंपूट हलवीत भयभीत चित्तानें उभें रहावें व पुन्हा गाडीमागून धांवत जावें. एक दोनदां गोपाळानें गाडीखालीं उतरून तिला दगड फेंकून मारला; तेवढ्यापुरती ती अंग चोरून तेथून दूर पळाली; पण पुन्हा अंमळशानें आपली गाडी मागोमाग हजर !

तेव्हां गोपाळाला त्या कुत्रीची दया आली व त्यानें तिला 'यू ! यू !' करून बोलाविलें. त्या बरोबर ती कुत्री भीत भीत धांवत त्याच्यापाशीं आली. गोपाळानें तिला गाडींत चढण्याला हातानें खुणावलें, त्याबरोबर ती चट्कन् उडी मारून गोपाळाशेजारीं गाडींत बसली. तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तिला गोपाळाविषयीं इतका विश्वास वाटूं लागला कीं, ती त्याच्या पायापाशीं बसलेली उठून त्याच्या पाठीवर उड्या मारूं लागली; व एकदोन वेळां तर तिनें त्याचें तोंडही चाटलें.

घरी जातांच गोपाळानें प्रथम तबेल्याच्या एका कोपऱ्यांत थोडें गवत टाकून त्या कुत्रीला झोंपण्याला जागा करून दिली, आणि लगेच घरांतून उरलेलें अन्न आणून तिला खाऊं घातलें. तिचें पोट भरलें व ती गवताच्या बिछान्यावर झोंपी गेली.

दुसऱ्या दिवशीं गोपाळानें अशी एक कुत्री जवळ केल्याबद्दल आपल्या धन्याला सांगितलें व धन्यानेंही तिला ठेवून घेण्याला संमति दिली. धन्यानें

त्या कुत्रीला मुद्दाम एकवार पाहिलें. ती उपासमारीनें अगदीं मरतुकडी दिसत असली तरी एरव्हीं तरतरीत व सुंदर होती.

परंतु थोड्याच दिवसांत त्या कुत्रीचा एक मोठा दोष सर्व मंडळींना कळून आला. ती वर्षाचे बाराही महिने जोडीदार कुत्र्याला हपापलेली असे. थोडयाच दिवसांत तिनें माहुलीच्या व आजूबाजूच्या बहुतेक कुत्र्यांशीं मैत्री केली. ते तिचे मित्र तिच्या घरासभोंवार दररोज घिरट्या घालूं लागले. ती देखील एखाद्या वाकबगार वारांगनेप्रमाणें प्रेमचेष्टा करून आपल्या प्रियकरांना झुलवीत असे. प्रत्येक कुत्र्याला वाटावें कीं, ही आपणाला तेवढीच वश झाली आहे. त्यामुळें ती दिवसारात्रीं कुठेंही असली तरी सर्व जातीच्या कितीतरी लहानमोठ्या कुत्र्यांचा तांडा नेहमीं तिच्या सभोंवार असायचा. रस्त्यानें ती त्या सर्व कुत्र्यांना आपल्या मागोमाग बराच वेळ हिंडवी, आणि तेथून ती तबेल्यांत आपल्या मुक्कामावर आली कीं तिचे प्रियकर तेथें येऊन तिच्या सभोंवार ओळीनें धापा टाकीत उभे रहात. त्या वेळीं त्यांच्या जिभेवरून लाळेच्या धारा वहात असत.

गांवच्या सर्व लोकांना हा एक मोठाच चमत्कार वाटूं लागला. असला विचित्र प्रकार यापूर्वीं त्यांनीं कधींच कोठें पाहिला नव्हता.

रात्रींच्या वेळीं ती कुत्री वस्तीला जेव्हां तबेल्यांत येई, तेव्हां कुत्र्यांचा तांडाच्या तांडा तिच्या मागोमाग आधाळभूतपणानें धांवत येतांना बागेची व आजूबाजूच्या जागेची फारच खराबी करी. त्यांनीं कुंपण मोडून टाकावें, बागेंतलीं कोंवळीं कोंवळीं झाडें तुडवून नाहींशीं करावीं, किंवा रोपट्यांच्या मुळांतली माती पंज्यांनीं उकरून त्या रोपट्यांची वाताहात करावी. त्यामुळें बागेच्या माळ्यालाही तो एक मोठाच त्रास वाटूं लागला. त्याखेरीज त्या कुत्र्यांनीं रात्रभर त्या घरासभोंवार भुंकून भुंकून एकच हलकल्लोळ माजवावा. त्यांना हाकलण्याचा कोणीं कितीही प्रयत्न केला तरी कांहींही उपयोग होत नसे.

दिवसा जेव्हां ते कुत्रे त्या कुत्रीच्या मागोमाग तिकडे येत, तेव्हां ते बेलाशक घरांतदेखील घुसत असत. तो त्रास तर घरच्या मंडळींना मुळींच सहन होण्यासारखा नव्हता. पण त्यांचा तेथें नाइलाज होता. त्यांनीं पहावें तों पंढरीच्या यात्रेला जसे वारकरी जातात तसे आजूबाजूच्या दहाबारा मैलांच्या टांपूतून झाडून सारे लहान मोठे कुत्रे त्या कुत्रीला भेटावयासाठीं

येत. त्यांत कांहीं सुंदर व स्वच्छ असत, तर कांहीं कुरूप व घाणेरडे असत; कांहीं पाळींव असत तर कांहीं उंडारलेले उडाणटप्पू असत. कांहीं कुत्रे तर चित्त्यासारखे भयंकर दिसत. त्यांना पाहून घरांतलीं मुलें भीत असत.

तरी देखील गोपाळाचें त्या कुत्रीवर मनापासून प्रेम होतें. त्यानें तिचें 'मनी' असें नांव ठेवलें होतें. तो वारंवार ज्याच्या त्याच्यापाशीं कौतुकानें म्हणे, "माझ्या मनीला वाचा नाहीं एवढेंच काय तें, एरव्हीं तिच्यांत आणि माणसांत कांहींच फरक नाहीं इतकी ती शहाणी आहे." त्यानें मनीसाठीं तांबड्या रंगाच्या कातड्याचा एक सुंदर पट्टाही तयार करून घेतला होता. आणि त्या पट्ट्यावर विनोदानें लिहिलें होतें, "श्रीमती मनूताई. मालक-गोपाळराव शिंदे."

मनीला गोपाळच्या घरचा सहवास चांगलाच मानवला. तिची खाण्यापिण्याची चैन चालल्यामुळें लौकरच ती लठ्ठ झाली व पूर्वींच्याहून सुंदर दिसूं लागली. तिला आतां पूर्वींच्याइतकें जलद चालतां येईनासें झालें. वाजवीपेक्षां फाजील लठ्ठ माणसें जशीं घोटाळत चालतात तशी तीही चाले. ती थोडीशी धांवली तरी धापा टाकूं लागे.

वर्षांतून ती मनी चार वेळां वीत असे, व प्रत्येक वेळीं बरींचशीं पिल्लें तिला होत. त्यांतही मौज अशी कीं, तीं सर्व पिल्लें एका जातीचीं नसत. एक एका प्रकारचें, तर दुसरें दुसऱ्याच प्रकारचें. गोपाळानें आपल्या मित्राला अगर दुसऱ्या कोणाला देण्यासाठीं त्यांतलें एखादें चांगलेंसें पिल्लू निवडून काढून ठेवावें आणि बाकीचीं नेऊन नदींत फेंकून द्यावींत.

थोड्याच दिवसांत घरची स्वयंपाकीणही मनीविषयीं तक्रार करूं लागली. कारण स्वयंपाकघरांत दुभत्याच्या कपाटाखालीं, धान्याचे डबे ठेवण्याच्या शिडीवर, वगैरे सर्वत्र मनीचे प्रियकर मनसोक्त नाचूं लागले. ते नुसतेच नाचत नसत, तर खावयाला जें कांहीं सांपडेल तें खाऊन वर त्याची नासधूसही करीत.

धन्याच्या कानीं ह्या कागाळ्या गेल्या तेव्हां धन्यानें गोपाळाला त्या कुत्रीची कायमची विल्हेवाट लावायला सांगितलें. धन्याचा हट्टी स्वभाव गोपाळाला चांगला माहीत होता. त्यानें प्रथम मनीला कोणी ओळखीचा गृहस्थ ठेवून घेतो का पाहिलें; आणि तसा कोणीच भेटेना तेव्हां त्यानें

आपल्या एका ओळखीच्या मोतद्दाराबरोबर त्याच्या गाडींतून तिला दूर परगांवीं नेवून सोडण्याची व्यवस्था केली.

पण त्याच दिवशीं सायंकाळीं पुन्हा मनी नेमकी घरीं हजर !

गोपाळानें त्याच दिवशीं साताऱ्याहून पुण्याला जाणाऱ्या एका मोटारवाल्याला गांठलें व त्याला आठ आणे देऊन मनीला पुण्यांत नेऊन सोडण्याचें काम सांगितलें.

परंतु चार दिवसांनीं मनी पुन्हा घरीं यावयाची ती आलीच !

तें पाहून गोपाळाप्रमाणेंच घरच्या धन्यालाही मनीची दया आली व त्यानें तिची पिडाटाळ करण्याला गोपाळाला पुन्हा सांगितलें नाहीं.

परंतु थोड्याच दिवसांत पुन्हा मनीकडे येणारा प्रियकरांचा परिवार झपाट्यानें वाढूं लागला; आणि ते सर्व कुत्रे घरांत मनस्वी त्रासही देऊं लागले. घरधन्याचा जांवई सासुरवाडीला आला त्याप्रीत्यर्थ मेजवानीचा बेत एके दिवशीं ठरला. त्या मेजवानीसाठीं अनेक कोंबड्या खरेदी करण्यांत आल्या होत्या; त्यांतली एक कोंबडी एका कुत्र्यानें स्वयंपाकिणीच्या डोळ्यां-देखत पळविली. स्वयंपाकिणीला कांहीं ती परत मिळाली नाहीं.

ती बातमी धन्याच्या कानीं जातांच धन्यानें संतापाच्या भरांत गोपाळाला निक्षून सांगितलें, " त्या कुत्रीचा तूं जर उद्यां उजाडण्यापूर्वीं कायमचा बंदोबस्त केला नाहींस आणि ती पुन्हा माझ्या घरांत दिसली, तर तिला मी गोळी घालून ठार मारीन, आणि तुलाही नोकरीवरून काढून टाकीन. "

गोपाळाच्या मनाला धन्याच्या धमकीचा धक्का बसल्यासारखं झाला. कांहीं वेळ त्याच्या मनांत विचारांची ओढाताण चालली होती, "काय करूं ? नोकरीवर लाथ मारून जाऊं काय ? त्या गरीब मुक्या प्राण्यापुढें नोकरीची काय किंमत ? "

त्या विचारासरसा गोपाळ तडक आपल्या बिऱ्हाडीं गेला व सामान आवरूं लागला. पण पुन्हा त्याच्या डोक्यांत विचार आला कीं, " ही नोकरी सोडल्यावर दुसरी कोठें मिळणार ? बरें, दुसरीकडे गेलें तरी हें मनी कुत्रीचें लटांबर मागें असणारच. " गोपाळ ज्या घरीं नोकरीला होता, तें घर सर्व दृष्टींनीं त्याला सुखाचें होतें. पगारही चांगला मिळे व जेवणही

सुग्रास मिळे. या सर्वांवर लाथ मारून कुत्रीची काळजी वाहण्यासारखें तिच्यांत विशेष कांहीं नाहीं असें गोपाळाला वाटलें. त्यानें तिची उजाडल्या सकाळीं वासलात लावण्याचा निश्चय केला. तथापि त्याला रात्रभर झोंप मात्र सुखाची लागली नाहीं.

उजाडल्यावर गोपाळ उठला व तबेल्यांतून एक भला लांबलचक दोर घेऊन कुत्रीच्या शोधार्थ निघाला. बाहेरील बाजूला एका गवताच्या गंजीखालीं ती सुखानें झोंपी गेली होती. ती धन्याचीं पावलें ऐकतांच चटकन् कान फटकारून व सर्व अंग एकदां झाडून जणू काय धन्याचा आदरसत्कार करण्यासाठीं पुढें आली. तिच्या जिवाचा नाश करण्याचें धैर्य जें गोपाळानें आपल्या अंगीं बळेंच उत्पन्न केलें होतें तें त्या क्षणीं त्याला सोडून जाऊं लागलें. भूतदयेनें प्रेरित होऊन तो मनीला जवळ घेऊन कुरवाळूं लागला व निरनिराळ्या लाडक्या नांवानीं तिला हांका मारून वत्सलतेनें तिचे मुके घेऊं लागला.

तोंच ओसरीवरच्या घड्याळांत सातांचे ठोके पडले. आतां वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं असें पाहून गोपाळ तबेल्याकडे वळून व मनीला म्हणाला, "चल."

तबेल्यांतून कपडे करून तो दोर घेऊन नदीकडे निघाला. कुत्री त्याच्या मागोमाग उड्या मारीत चालूं लागली. नदींत एका ठिकाणीं मोठा डोह होता, त्याच्या काठीं तो येऊन पोहोंचला. लगेच त्यानें आपल्या हातांतील दोराचें एक टोंक कुत्रीच्या गळपट्ट्याला बांधलें. लगेच तेथला एक मोठा धोंडा उचलून त्या धोंड्याला दुसरें टोंक बांधलें. मनीला त्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळें ती त्याच्या सभोंवार गमतीनें नाचूं बागडूं लागली. त्यानें तिला उचलून पोटाशीं धरलें व तिला कुरवाळीत तिचे कितीतरी मुके घेतले.

नंतर मात्र त्यानें त्या कुत्रीला डोहांत फेंकून देण्यासाठीं नदीच्या कांठीं नेलें आणि फेकण्याचा धीर होईना म्हणून पुन्हा तिला घेऊन माघारीं आला. असा प्रकार कमींत कमी दहा वेळा झाला. त्या प्रत्येक वेळीं त्याचें धैर्य त्याला सोडून जात होतें.

अखेर त्यानें एकवार आपल्या मनाचा कायमचा निश्चय केला आणि मनीला त्या जड धोंड्यासह उचलून डोहांत फेकून दिलें. तो नेहमीं नदीवर आंघोळ करावयाला गेला कीं मनी त्याच्या मागोमाग जाई व त्याच्या बरोबर

नदींत पोहूं लागे; तशीच ती आजही पोहण्याचा प्रयत्न करूं लागली. परंतु धोंडयाच्या भारानें तिचें डोकें क्षणोक्षणीं पाण्यांत जास्त जास्त बुडूं लागलें. ती आपणाला धन्यानें वांचवावें म्हणून त्याच्याकडे आशेनें पाहूं लागली. परंतु गोपाळानें तेव्हां तिच्याकडे पाठ फिरविली होती. हळूहळू मनीच्या शरिराचा तोंडाकडचा बहुतेक भाग पाण्यात बुडून गेला व आतां तिच्या मागच्या पायाची तडफड काय ती ओझरती दिसत होती. आणखी थोड्या वेळानें तीही दिसेनाशी झाली.

सुमारें पांच मिनिटेंपावेतों त्या जागेवर पाण्यांतून एकसारखे बुडबुडे येत होते. कोणाला वाटावें कीं जणूं नदीचें पाणी उकळूं लागलें आहे. गोपाळ मागें वळून तें अनुकंपामय दृश्य पाहून स्वतःच्या मनाशीं म्हणाला, " तो बिचारा मुका प्राणी माझ्याविषयीं मनांत काय म्हणत असेल ? "

तेव्हांपासून गोपाळाला वेड लागल्यासारखें झालें. आठ नऊ दिवस तो अंथरूणावर पडून होता. त्या प्रत्येक रात्रीं त्याची मनी त्याला स्वप्नांत येऊन भेटे, त्याचे हात चाटी व आल्या-गेल्यावर भुंके. त्याच्या धन्यानें ताबडतोब एका निष्णात वैद्याला बोलावून गोपाळला औषधोपचार सुरू केले. त्यामुळें तो आठ दहा दिवसांत बरा झाला. नंतर धन्यानें हवापालट करण्यासाठीं म्हणून वाईजवळ त्याची मोठी शेतवाडी होती तिकडे त्याला नेलें. तेथें गोपाळाची प्रकृति हळूहळू सुधारूं लागली. तो मधून मधून गाडी देखील हाकूं लागला, व पूर्ववत् कोणाना कोणा सोबत्याबरोबर नदीवर पोहावयाला जाऊं लागला.

एके दिवशीं तो असाच आपल्या दुसऱ्या एका सोबत्याबरोबर नदीवर पोहावयाला गेला असतां एकदम सोबत्याला हाक मारून म्हणाला, " नरहरी, तें पहा समोरून काय वहात येतें आहे. आज आपण तुला चांगली मेजवानी देणार."

तें एक कोणातरी प्राण्याचें प्रेत होतें. त्या प्रेताच्या अंगावरचे सर्व केस अगदीं झाडून गेले होते व सर्व अंग अत्यंत फुगलें होतें. पाण्याच्या प्रवाहाबरोबर तें प्रेत वहात येतांना त्याचे पुढचे दोन पंजे फक्त पाण्याच्या पृष्ठभागावर स्पष्ट दिसत होते. गोपाळाला वाटलें की कोणाचा तरी बकरा वरून वाहात आला आहे, तो मेजवानीला उपयोगी पडेल,

गोपाळ तें प्रेत पकडण्यासाठीं पोहत पोहत जवळ जातांना म्हणाला, " अरे बापरे ! हा केवढा मोठा बकरा आहे ! मला वाटतें पंचवीस माणसांना याची मेजवानी पुरेल."

× × ×

गोपाळानें तें प्रेत ओढीत किनाऱ्यावर आणलें व त्याच्याकडे एकदां न्याहाळून पाहिलें मात्र; आणि त्याच क्षणीं त्याची चर्या एकदम कोमेजली. तो पुन्हा त्या प्रेताजवळ गेला व निरखून पाहूं लागला. त्यानें प्रथम त्या प्रेताच्या गळ्यांतला कातड्याचा पट्टा पाहिला. तेथे त्याला कांहींतरी कोरलेलें दिसलें, म्हणून तो जास्त लक्षपूर्वक पहातो तों त्यावर कोरलेला मजकूर त्याला दिसला, " श्रीमती मनूताई, मालक गोपाळराव शिंदे. "

मनी कुत्रीनें आपल्या मृत्यूनंतरही इतक्या दूरवर येऊन आपल्या धन्याची भेट घेतली !

ते पाहातांच गोपाळ एकाएकीं उन्माद झाल्यासारखा एकवार ओरडला, व तेथून जो पळाला तो त्या क्षणापासून वेडाच झाला.

त्याला मग वेड्याच्या इस्पितळांत नेऊन ठेवण्यांत आलें.

# बायको त्याची; पण मुलें कुणाचीं ?

रामशरण गुप्त हे साऱ्या नागपूर शहरांत एक नाणावलेले फौजदारी वकील होते. त्यांतल्या त्यांत घटस्फोटाचे खटले चालविण्यात तर त्यांचा अगदीं हातखंडा होता. अर्थात् पांढरपेशा समाजात घटस्फोट घेण्याची प्रथा अगदीं अलीकडची असल्यामुळें तसले खटले चालविण्यातील वाकबगारीबद्दल रामशरणबाबूंना शिफारसपत्र देणें जरी काहींसें उतावीळपणाचें ठरलें असतें, तरी हरएक फौजदारी खटले चालविण्यांत त्यांची दिसून येणारी बाकबगारी याही बाबतींत त्यांची प्रशंसा करण्याला अगदीं पुरेशी होती. आणि नागपूरचे प्रतिष्ठित लोक तर असेही म्हणूं लागले होते कीं, रामशरणबाबू जर नेहमींच बायकांचीं वकीलपत्रें घेऊन घटस्फोटाचे खटले चालवूं लागले, तर असंतुष्ट बायकांच्या नवऱ्याची धडगत नाहीं.

आज रामशरणबाबू कुठल्या तरी एका खटल्याविषयीं एकटेच स्वतःशीं विचार करीत आपल्या कचेरींत बसले असताना त्यांच्या कचेरीचा कळीचा दरवाजा उघडला गेला व पिळदार मिशाचा एक जाडजूड गृहस्थ आंत आला.

" या, बसा. " वकील म्हणाले, व त्यांनी शेजारच्या खुर्चीकडे अंगुलिनिर्देश केला.

त्याचा पक्षकार त्या खुर्चीवर बसला व एकदोनदां खोकून घसा साफ करून म्हणाला, " वकीलसाहेब, माझ्या बाबतींत तुम्हाला घटस्फोटाचें वकीलपत्र देण्यासाठीं मी आलों आहे. "

" बोला, मी ऐकतों आहे."

" मी एक माजी वकील आहें."

" खरेंच ? "

" खरेंच. सध्यां माझें वय बेचाळीस वर्षांचें आहे."

" बरें पुढे ? "

" मीं लग्नाच्या निमित्तानें एक घोरपड माझ्या गळ्यांत बांधून घेतली आहे. ती खरोखर एक घोरपड आहे."

" आपल्या हिंदुसमाजांत असे कांहीं तुम्ही एकटेच नवरे नाहीं. "

" तें मी जाणतों. असे आणखी पुष्कळ नवरे असतील व त्यांच्याविषयीं मला सहानुभूतीही वाटते. पण माझा प्रश्न त्या सर्वांच्याहून अगदीं निराळा आहे. माझ्या पत्नीविरुद्ध माझ्या ज्या तक्रारी आहेत त्या असामान्य आहेत. तो साराच वृत्तांत मी आतां आपणाला सांगतों. माझें हें लग्न फारच चमत्कारिक रीतीनें झालें...."

" असल्या चमत्कारिकपणाच्या कल्पनांवर तुमचा विश्वास आहे काय ? तुम्ही काय म्हणतां तें मला कळलें नाहीं."

" माझें म्हणणें असें कीं, कांहीं कांहीं कल्पना कांहीं कांहीं विशिष्ट मनाच्या माणसांना फार जाचक होतात. शरिराला जसें विष तसें त्यांच्या मनाला तें कल्पनेचें विष बाधतें."

" तसेंही असेल कदाचित्. "

" असेल नाहीं आहे. कांहीं कल्पना अशा असतात कीं त्यांचे निराकरण करण्याला आपण जर असमर्थ ठरलों, तर त्या आपल्या मनांत शिरतात, आपणाला भेडसावतात व अगदीं वेडेपिसे करून सोडतात. ह्यांपैकीं एखाद्या कल्पनेला आमच्या दुर्दैवानें आमच्या मनावर ताबा मिळाला आणि त्या कल्पनेचा भयंकरपणा आपणाला वेळींच कळला नाहीं तर ती कल्पना तेथेंच आपलें घर करते; ती पुनःपुन्हा तेथें येऊन सैतानी नृत्य करूं लागते; मग आमच्या मनाचा तोल आम्हाला सावरेनासा होतो; प्रत्येक गोष्टींत आमचें दुर्लक्ष होऊं लागतें; आमची सारासार विचारबुद्धि लुळी पडते; आणि मग आमचें जिणें अगदीं व्यर्थ ठरतें. मी एक माजी वकील आहें असें आतां आपणाला सांगितलेंच. मी उमरावतीला वकिली करीत होतों. मला त्या वेळीं फारसा पैसा मिळत नसे. त्यामुळें मला माझ्या सर्व सुखलालसा बळेंच आटोक्यात ठेवाव्या लागत.

" एके दिवशीं मी कोर्टांत मला कांहीं काम नसल्यामुळें वकिलांच्या बैठकीच्या खोलींत एक ताजें दैनिक वर्तमानपत्र वाचीत बसलों असतांना 'पाहिजे' या सदराखालीं पुढील जाहिरत मला दिसून आली."

"एका कुलीन, सुशिक्षित, सुंदर व तरुण स्त्रीला लग्नाच्या हेतूनें एका योग्य तरुणाशीं मैत्री करावयाची आहे. त्या स्त्रीच्या मालकीची दोन लाखांची इस्टेट आहे. समक्ष भेटावें. तिऱ्हाईताची गरज नाहीं."

"त्या दिवशीं सायंकाळीं मी कोर्टांतून निघालों तो घरीं न जातां माझ्या एका सॉलिसिटर मित्रांच्या घरीं गेलों. माझा आणखी एक मित्र अनेक पिठाच्या गिरण्यांचा मालक होता तोही तेथें होता. चहा पितां पितां आमच्या वादविवादांत लग्नाचा विषय कसा निघाला कोण जाणे ! त्या भरांत मीं सायंकाळीं वर्तमानपत्रांत वाचलेली एका श्रीमान विवाहेच्छु स्त्रीची हकीकत त्यांना सांगितली."

"ह्या बायकांची जात तरी कोणती ?" माझा गिरणीवाला मित्र म्हणाला.

"का त्यात काय झालें ? असें म्हणून माझ्या सॉलिसिटर मित्रानें ह्या जाहिरातीच्या पद्धतिनुसार घडून आलेल्या चार दोन यशस्वी लग्नांची माहिती त्या बैठकींत सांगितली आणि लगेच तो माझ्याकडे वळून म्हणाला, "तं स्वतः त्या स्त्रीशीं लग्न करण्याचा कां प्रयत्न करीत नाहींस ? फुकटचे दोन लाख रुपये मिळतील आणि वर मनाजोगती बायकोही मिळेल."

"याप्रमाणें आणखी बराच वेळ आमची आपसांत थट्टामस्करी चालली होती. अमळशानें तो विषय थांबला व दुसरा विषय निघाला. आणखी सुमारें तासभर गप्पागोष्टी झाल्यावर मी माझ्या बिऱ्हाडीं गेलो."

त्या रात्रीं थंडी बरीच पडली होती. तशांत मी ज्या घरांत रहात होतों तें घरही थंडीवाऱ्याच्या दिवसांत फारसें सुखावह नव्हतें. मी माडीचा जिना चढूं लागलों तेव्हां त्या जिन्याच्या लोखंडी कठड्याला स्पर्श होतांच माझ्या हाताला जणूं विंचू डसल्याचा भास झाला. त्यासरसा मीं माझा दुसरा हात आधारासाठीं भिंतीला टेकला, तों भिंतही तितकीच गारठलेली हाताला लागली. त्याच क्षणीं मला एकदम त्या गोष्टीची आठवण झाली व मी स्वतःशीं उद्‌गारलों, "देवा ! माझ्यापाशीं दोन लाख रुपये असते तर ?"

"तो विचार मनांत घोळवीत मी माझ्या झोंपण्याच्या खोलींत गेलों. तों तेथेंही माझें मूर्तिमंत दारिद्र्य उभें असलेलें पाहून माझ्या मनाला हळहळ

वाटली कीं, असल्या गरिबीच्या जिण्यापेक्षां मरण बरें. तेव्हांही अर्थात् दोन लाख रुपयांची आठवण मला झाल्याखेरीज राहिली नाहीं.

" तथापि, खरें सांगायचें तर त्या रात्रीं मी बिछान्यावर पडेपर्यंत मला त्या स्त्रीची आठवणही कधीं झाली नव्हती. बिछान्यावर पडल्यावर मात्र त्या आठवणानं मनाला इतकी तळमळ लागून राहिली कीं, तळमळीमुळें मला झोंप येण्याला बराच वेळ लागला.

" दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुमारें सहा वाजण्याच्या वेळीं मी जागा झालों. त्या दिवशीं मला सकाळच्या वेळीं एका महत्त्वाच्या कामासाठीं बाहेर जायचें होतें. आणि बाहेर तर थंडी मी म्हणत होती. परंतु करणार काय ? भिणभिणण्यापूर्वीं मला त्या नियोजित स्थळीं जाऊन पोंहोचायला पाहिजे होतं. अरेरे ! देवा, माझ्यापाशीं दोन लाख रुपये असते तर ?

" त्या दिवशींचें काम आटोपून बरोबर दहा वाजतां मी माझ्या कचेरींत आलों. तेथलें जुजबी काम आटोपून मी माझ्या दोनप्रहरचें दारिद्री जेवण उरकून घेतलें व पुन्हा कचेरीतल्या कामाला लागलों. त्या वेळीं मात्र मला त्या श्रीमान् तरुण स्त्रीची क्षणोक्षणीं आठवण होऊं लागली आणि त्याबरोबरच मनांत प्रश्न उभे राहिले, " ती श्रीमान् तरुणी कोण बरं असावी ? तिला मी पत्र कां पाठवूं नये ? तिचा शोध मी कां करूं नये ? "

अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर सुमारें पंधरा दिवसांपावेतों तीच एक कल्पना माझ्या मनांत एकसारखा पिंगा घालीत होती. तोंपर्यंत मी माझे सर्व कर्मभोग, सर्व संकटें व सर्व दुःखें स्वतःला न कळत निमूटपणें सहन करीत होतों. पण त्यांनींच आतां सुयाटोचण्यांप्रमाणें माझ्या हृदयाची बोचून बोचून अगदीं चाळण करून सोडली. त्या प्रत्येक टोंचणीबरोबर माझें मन त्या तरुण स्त्रीकडे अधिकाधिक ओढलें जाऊं लागलें.

" अखेर मी माझ्या मनांत त्या स्त्रीचें कल्पनाचित्र रंगवूं लागलों. आपणाला ज्या वेळीं एखादी गोष्ट पाहिजे असते, त्यावेळीं तिचें कल्पनाचित्र आपण जें मनांत रंगवितों तें अर्थातच आपल्या आवडीनिवडीच्या अनुरोधानें रंगविलें जातें. सामान्यतः अशा श्रीमान, सुंदर व तरुण स्त्रीवर वर्तमानपत्रांत 'वर पाहिजे' अशी जाहिरात देण्याची पाळीच येऊं नये. तथापि ती

विशिष्ट मुलगी श्रीमान्, तरुण व सुंदर असूनही कमनशिबी असेल ! त्याचा काय नेम सांगावा ?

" मात्र दोन लाखांची माया त्या स्त्रीपाशीं आहे म्हणून संपत्तीच्या आशेनें माझ्या तोंडाला पाणी सुटलें असा त्याचा अर्थ नव्हे. कारण असल्या श्रीमंतीच्या जाहिराती पुष्कळदां अतिशयोक्तीच्याही असूं शकतात. तथापि त्यांत अ दींच सत्य नसतें असें नाहीं. कधीं कधीं तर ह्या श्रीमंतीच्या गोष्टी अक्षरशः खऱ्याही असूं शकतात.

" उदाहरणादाखल सांगतों. एका तरुण व सुंदर मुलीला अशीच लाखमाप श्रीमंती मिळाली; परंतु जाणतेपणीं तिला कळून आलें कीं, आपण अकुलीन आहों. त्या मुलीची आईही तिच्या बापाची ठेवलेली स्त्री होती. तो अकुलीनतेचा डाग झांकला जाण्यासाठीं ती मुलगी आपल्या श्रीमंतीच्या जोरावर एखाद्या गरीब पण कुलीन वराशींही लग्न करायला तयार होती.

" त्या स्त्रीविषयींच्या माझ्या एकंदर कल्पना कांहींशा विचित्र होत्या हें खरें. परंतु त्या कल्पनांच्या आधारानेंच मी चालत होतों. वस्तुतः माझ्यासारख्या वकिलीपेशाच्या माणसानें कादंबऱ्या वाचून त्यांतील कल्पितकथांबरोबर वाहात जाणें चांगलें नव्हे; तथापि मी कादंबऱ्यांचा मोठा शोकी होतों एवढें मात्र खरें.

" तेव्हां सांगावयाची गोष्ट मीं लगेच कोणा पक्षकाराचें वकीलपत्र घेतल्याचें मिष करून त्या पक्षकाराच्या वतीनें त्या स्त्रीला एक पत्र लिहिलें.

" त्यानंतर बरोबर पांचच दिवसांनीं दोनप्रहरीं तीन वाजण्याचे वेळीं माझ्या कारकुनानें आंत येऊन माझ्या भेटीसाठीं बाहेर मंदाकिनी वेल्हाळ या नांवाची कोणी स्त्री आल्याचें सांगितलें. तिला आंत पाठवून देण्याला मीं सांगितलें. थोड्यांच वेळांत एक तरुण व सुंदर अशी सुमारें वीस वर्षांची स्त्री माझ्यापुढें येऊन उभी राहिली. ती मीं दाखविलेल्या खुर्चीचा स्वीकार करून म्हणाली, " आपल्या पत्राप्रमाणें मी आलें आहें."

" पण तुम्ही कोण हें मला अजून कळलें नाहीं " मी म्हणतें.

" तुम्ही जिला पत्र पाठविलेंत तीच मी. "

" लग्नाविषयींचें पत्र काय ? "

" होय. "

" अस्सें !"

" असल्या गोष्टी सांगोवांगीनें पार पडत नसतात म्हणून मी आलें आहें."

" बरोबर आहे तुमचें म्हणणें. बरें तुम्हांला लग्न करायचें आहे म्हणतां, होय ना ?"

" होय."

" तुम्हांला आईबाप आहेत काय ? "

ती स्त्री किंचित् गोंधळली व उत्तर देण्याला कां कूं करूं लागली. परंतु कांहीं क्षण गेल्यावर ती आपणहून म्हणाली, " नाहीं...माझीं....आईबापें ...हयात नाहींत."

मीं मनांत म्हटलें कीं माझा तर्क बरोबर ठरला. त्याच क्षणीं त्या तरुण स्त्रीविषयीं विशिष्ट अनुकंपा माझ्या मनांत जागृत झाली. तिच्या मनाला वाईट वाटूं नये म्हणून तिच्या जातकुळीचा प्रश्न टाकून मीं तिला विचारलें, " तुम्ही तुमची जी दोन लाखाची इस्टेट आहे म्हणतां ती अगदीं निष्कर्जी व कोणत्याही भानगडीपासून मुक्त आहे काय ? "

यावर मात्र ती स्त्री कां कूं न करतां उत्तरली, " होय "

मीं त्या तरुणीकडे लक्षपूर्वक पाहिलें, तेव्हां मला तिच्याविषयीं आदर व अभिमान वाटूं लागला. ती वयानें केवळच तरुण नव्हती; ती प्रौढांत मोडूं लागली होती. परंतु तिच्या शरिराचा बांधा फारच सुंदर असल्यानें नुकत्याच फुलांच्या ताटव्यावरून तोडलेल्या पूर्णविकसित टवटवीत फुलासारखी ती दिसत होती. तेव्हा मला साहजिकपणेंच वाटूं लागलें कीं आपण स्वतःच घेतलेलें काल्पनिक पक्षकाराचें वकीलपत्र फाडून टाकावें व स्वतःची ओळख देऊन तिच्यापाशीं प्रेमयाचना करावी. तथापि दुसऱ्याच क्षणाला वाटलें कीं एकदम इतका आपलेपणा बरा नाहीं. असा विवेक करून मी तिला म्हणालों, " ज्यांच्यासंबंधीं मीं सध्यां तुमच्याशीं बोलत आहें, ते माझे पक्षकार फार गंभीर वृत्तीचे व अब्रूदार असे मान्यतेचे सद्गृहस्थ आहेत. परंतु ते शरिरनें अंमळ दुबळे आहेत."

" अस्सें ! पण मला तर शरिरानें धट्टेकट्टे, हाडापेरानें मजबूत व सशक्त पुरुष आवडतात."

" पण तुम्ही त्यांना एक वेळ पहा तर खरें ! ते तुम्हाला आणखी चार दिवसांनीं भेटूं शकतील. कालच ते आकोल्याला कांहीं कामासाठीं गेले आहेत."

" चार दिवस वाट पाहावयाची ! किती उशीर हा ?"

" त्याला कांहीं इलाज नाहीं. पण तुम्हांला ताबडतोब घरीं माघारें गेलेंच पाहिजे काय ? तुमची कांहीं हरकत नसेल तर माझ्या घरीं तुम्ही तेवढे चार दिवस पाहुणचार घ्यावा अशी माझी विनंती आहे. माझी खात्री आहे कीं तुमचा काळ इथें अगदीं आनंदांत जाईल. "

" तुम्ही फारच प्रेमळ गृहस्थ आहां. मी तुमच्या ह्या सूचनेबद्दल फार आभारी आहें. पण तुमच्याकडेच राहण्यांत विशेष काय आहे ? "

" तुम्ही इथें कुठें उतरलां आहां ? "

" मी सुखनिवासाश्रमांत उतरल्यें आहें. "

" बरें तर, आज सायंकाळीं आमच्याकडे तुम्ही जेवावयाला तरी आलेंच पाहिजे. "

" ती स्त्री यावर होय म्हणून निघून गेली. मी तिला दरवाजापावेतों पोंचवायला गेलों.

" कबूल केल्याप्रमाणें सायंकाळीं सात वाजतां ती तरुण स्त्री माझ्या घरीं आली. मीं त्या दिवशीं मुद्दाम एका आचाऱ्याला बोलावून सुग्रास जेवणाची व्यवस्था केली होती. मी दारिद्री असलों तरी माझें दारिद्य तिच्या नजरेला मीं कसें आणावें ? "

" आम्हीं रात्रीं आनंदानें एकत्र बसून भोजन केलें. आमची ती पहिलीच भेट होती खरी; पण त्या एकाच भेटींत आमची चांगलीच मैत्री जमली, व बोलण्याच्या ओघात ती तरुणी आपली कर्मकहाणी मला निवेदन करूं लागली, ती अशी: एका मोठ्या सरदारानें भ्रष्टविलेल्या थोर स्त्रीची ती मुलगी होती, व ती त्याच गांवीं रहात असे. तिच्या बापानें व . आईनें मरतेसमयीं आपली लाखांनीं मोजण्याजोगी इस्टेट तिच्याच नांवाने केल्यामुळें आतां ती चांगलीच श्रीमंत गणली जात होती. परंतु ती आपल्या आई-बापांचीं नांवें मात्र कोणालाही सांगण्याला तयार नव्हती. मीं माहिती मिळविण्यासाठीं जंग जंग पछाडले पण रामाचें नाव ! मात्र तिनें आपल्या

संपत्तीचा सर्व खुलासा माझ्यापाशीं केला, व एवढी मोठी इस्टेट रक्षण करण्याची तिची बेमालूम हातोटी पाहून मलाही कौतुक वाटलें. माझी एकंदर वर्तणूक पाहून त्या तरुणीच्या मनांत माझ्याविषयीं आपुलकी उत्पन्न झाल्याचें मीं तिच्या आनंदी वृत्तीवरून तेव्हां ओळखलें, व तीही मला तितकीच आवडत असल्याचें दर्शविण्यालाही मीं कमी केलें नाहीं."

" आतां ओघालाच आलें तेव्हां खरें सांगायलाच पाहिजे. मी कधीं कधीं थोडी थोडी चांगल्यापैकीं दारू घेतों. त्या दिवशीं मला ती लहर आली. त्या तरुणीलाही तशी हौशीखातर संवय असल्याचें मी तिच्या एकंदर हावभावावरून ओळखलें, व आम्हीं दोघांनीं त्या रात्रीं एकत्र मदिरापान केलें. थोड्याच वेळांत माझ्यावर दारूचा सौम्य अंमल चढूं लागला, व तिचीही तशीच अवस्था झाली. त्या उन्मादाच्या भरांत ती मला वश होईल अशी आशा मला वाटूं लागली, व मी आडपडद्यानें तशी भाषा बोलूं लागलों, तेव्हां अनुरूप अशीं उत्तरें देऊन ती मला अनुरक्तता दर्शवूं लागली. मीं तेवढ्यात किंचित् भानावर येऊन व माझ्या पक्षकाराचें नाव पुढें करून पुन्हा एकवार तिच्या इस्टेटीची खुलासेवार माहिती विचारून घेतली. कारण तिची संपत्ति हा तर माझ्या दृष्टीनें मुख्य प्रश्न होता."

" पण ती तरुणी माझ्यापेक्षाही धूर्त ठरली. तिनें एकाच बैठकींत सर्व प्रश्नांचा उलगडा करून घेण्याचे ठरवून आपल्या संपत्तिसंबधाचे सर्व महत्त्वाचे कागदपत्र आपणाबरोबर आणले होते. ते पाहून माझे सारे संशय दूर झाले व त्या आनंदाच्या भरात मीं त्या तरुणीला आलिंगन दिलें. मात्र तें माझें आलिंगन अगदीं शुद्ध भावाचें होतें; अंतःकरणाच्या समाधानाखेरीज दुसरा कोणताही भाव त्या वेळीं माझ्या मनात नव्हता. तिच्याही मनात तेव्हां कांहीं विकल्प आला नाहीं. तिनें माझ्या रसिकतेला जरादेखील नापसंती दर्शविली नाहीं. उलट समाधानच व्यक्त केलें—आणि त्याचा परिणाम मीं तिला—तो कदाचित् दारूचा परिणाम असेल...वश झालों...किंवा यापेक्षां खरें बोलायचे तर...ती मला वश झाली.

" आणि त्यानंतर...जितक्या सहृदयतेनें व जबाबदारी ओळखून मी तिच्याशीं वागूं लागलों, तितकीच तीही माझ्याशीं वागूं लागली. तिच्या नेत्रांतून कांहीं वेळ अश्रूंचीं दोन कारंजीं वाहूं लागलीं. यापुढे मी तिच्याशीं

विश्वासघात करूं नये, अशी ती माझी प्रार्थना करूं लागली. तेव्हां तिनें जें जें सांगितलें तें तें मीं बिनतक्रार कबूल केलें. तिनें मागितलीं तेवढीं वचनें मीं तिला दिलीं. तेव्हां तिचें समाधान झालें. नंतर ती संतुष्ट वृत्तीनें माघारी गेली. व मी घडलेल्या प्रकाराचा विचार करीत बिछान्यावर पडलों."

"आतां मीं काय बरें करणार ? कारण मी माझ्या पक्षकाराशीं अतिप्रसंग करून गूंतून पडलों होतों. मी त्या तरुणीला थाप मारल्याप्रमाणें खरोखरच एखादा तसा पुरुष पक्षकार माझ्यापाशीं असता तर गोष्ट निराळी होती. परंतु तसा कोणीच नव्हता, व अखेरपावेतों एकंदर प्रसंगाला तोंड देण्याची पाळी आता मजवर आली होती. माझी मीच स्वत: फसवणूक करून घेऊन चुकलों होतों. खरोखर, काय चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली पहा ! मी त्या तरुणीला तशीच ना–नकळेच्या न्यायानें वाटेला लावूं शकलों असतों, व तिलाही माझ्याविरुद्ध कांहीं ओरड करतां आली नसती. परंतु तिची दोन लाखांची इस्टेट ! दुसरें असें कीं एकवार आपण ज्या तरुणीच्या चांगुलपणाचा असा फायदा घेतला, तिच्याशीं विश्वासघात करणें मला तरी कसें शोभलें असतें ? असा माझ्या मनांत परस्परविरोधी विचारांचा एकच गोंधळ उडून गेला."

"तथापि समजा, मीं त्या तरुणीशीं लग्न लावलें असतें, तरी इतक्या सुलभतेनें परपुरुषाला वश होणारी ती पत्नीधर्म नीट पाळील याची तरी काय खात्री ? तोंवर तरी मी परपुरुषच होतों कीं नाहीं ! "

"असा ती सारी रात्र विचार कर कर करून मी केव्हां झोंपी गेलों तें माझें मलाच कळलें नाहीं. सकाळीं जागा झालों तेव्हां माझें मस्तक बरेंच शांत झालें होतें. मीं मुखमार्जन आटोपून चहा घेतला, व कपडे करून त्या तरुणीला भेटावयाला गेलों. मला पाहातांच ती एकदम लाजली व किंचित् खालीं मान घालून हंसऱ्या चेहऱ्यानें मजकडे पाहात उभी राहिली.

मी तिला म्हणालों, "बाई, मीं तुमच्या बाबतींत अक्षम्य अन्याय केला आहे हें मी कबूल करतों. त्या अन्यायाची भरपाई करण्यासाठीं म्हणून मी तुमच्याशीं लग्न लावूं इच्छितों. याला तुमची मान्यता आहे काय ? "

तिनें लाजत लाजत पण समाधानवृत्तीनें मला तेव्हांच होकार दिला. लगेच थोड्याच दिवसांत आमचें लग्न झालें.

" लग्नानंतरचे सहा महिने आम्ही पति-पत्नी अगदीं आनंदसागरांत पोहत संसार करीत होतों. माझी वकिली मुळांतच नीटशी चालत नव्हती, व आतां तर तेवढीही दगदग करण्याचें कारण मला उरलें नाहीं. कारण आतां माझ्या पत्नीची संपत्ति ती माझीच संपत्ति होती. "

" तथापि हळूहळू एक गोष्ट मात्र माझ्या डोळ्यांवर येऊं लागली. माझी पत्नी वारंवार जी घरांतून बाहेर जाई, ती बराच वेळ पावेतों माघारी येत नसे. हें तिचें वारंवार बाहेर जाणेंही नियमित होतें. एका आठवड्यांत ती मंगळवारीं बाहेर जाई, तर दुसऱ्या आठवड्याला शुक्रवारीं. ही मला फसवते आहे, पत्नीधर्म पाळण्यांत कुचराई करते आहे, असें माझ्या मनानें घेतलें, व मी तिच्यावर पाळत ठेवूं लागलों.

" तो मंगळवारचा दिवस होता. माझी पत्नी त्या रात्रीं बारा वाजण्याच्या सुमाराला बाहेर निघाली. तिची कल्पना कीं मी झोंपीं गेलों असेन. पण मी जागाच होतों. मीही तिच्या मागोमाग मुद्दाम कोणाला आपली ओळख मिळूं नये म्हणून बनावट मिशा व गॉगल्स लावून बाहेर पडलों. माझी पत्नी आपणाला कोणी पहात तर नाहीं ना, अशा संशयानें मागें पुढें पहात झपझप पावलें टाकीत स्टेशनच्या बाजूला चालली होती. तिच्या मागोमाग मी चाललों होतों. प्लॅटफॉर्म तिकिट काढून ती थेट प्लॅटफॉर्मवर गेली तेव्हां मीही तिच्या मागोमाग गेलों. मात्र मी जरा दूर उभा राहिलों. माझी एथवरच्या प्रत्यक्ष अनुभवावरून पूर्ण कल्पना झाली होती कीं माझ्या पत्नीचा कोणीतरी प्रियकर असला पाहिजे, व तो या ठराविक गाडीनें येऊन तिला भेटत असला पाहिजे. एरव्हीं अशा अपरात्रीं तिला माझा डोळा चुकवून स्टेशनवर येण्याचें काय कारण ? "

" थोड्याच वेळांत गाडी येण्याची घंटा झाली. जाणाऱ्या उतारूंची तारांबळ सुरू झाली. गाडी घेऊन स्टेशनांत उभी राहिली. उतारूंची चढउतर सुरू झाली. माझी पत्नी त्या गर्दींतूनच पुढें घुसली. मी तिच्या पाळतीवर होतोंच. गर्दींतून एक धट्टीकट्टी शेतकरीण स्त्री एका सुमारें तीन वर्षांच्या बालकाला घेऊन पुढें येतांना मला दिसली. माझ्या पत्नीनें त्या बालकाला घेऊन आपल्या पोटाशीं धरलें व त्याचे पटापट मुके घेण्याला सुरवात केली. ती एक लहानगी गोजिरवाणी मुलगी होती.

" लगेच माझी पत्नी अंमळ बाजूला वळली. दुसरी एक शेतकरीणबाई आणखी एका लहानग्या—जवळजवळ तान्ह्या मुलाला घेऊन जवळच उभी होती. माझ्या पत्नीनें त्या बालकाला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें व त्याचेही मटामट मुके घेतले. लगेच ती तेथून त्या दोन मुलांना त्यांच्या दायांच्या हातीं देऊन व त्या दोघींना बरोबर घेऊन स्टेशनच्या बाहेर पडूं लागली.

" मी त्या सर्वांचा पाठलाग करीत होतोंच. घनतोलीवरच्या एका निर्जन बंगल्यापाशीं माझी पत्नी आपल्या परिवारासह येऊन पोहोंचली. तेथून मात्र ती पुढें काय करते याचा विचार मीं केला नाहीं. मला तो विचार करवेनाच. आपल्या पत्नीच्या दुराचाराला आपणच साक्षीदार राहण्याचें कोणत्या मानी नवऱ्याला रुचेल ? मी तसाच डोळ्यावर कातडें ओढून माघार आलों."

" त्या रात्रीं पहांटे पांच वाजण्याच्या सुमाराला मी जागा झालों. पण तेव्हांही माझी पत्नी माघारी आली नव्हती. ती उजाडतें न उजाडतें तोंच आली. तिला पाहतांच मीं पहिलाच प्रश्न विचारला, " तीं मुलें कोणाचीं ?"

" कोणतीं मुलें ?" तिनें विचारलें.

" रात्रौ तूं स्टेशनावर ज्यांचे मटामट मुके घेतलेस व ज्यांना घेऊन तूं स्टेशनच्या बाहेर पडलीस तीं ! "

" माझ्या पत्नीला एकदम मूर्छा आली व रडूं कोसळलें. ती धाडकन् खालीं कोसळली. थोड्या वेळानें अंमळ शुद्धीवर आल्यावर तिनें खरा वृत्तांत मला कथन केला. त्यावरून मला कळून आलें कीं ती अशा चार मुलांची आई आहे-दोन मुली आणि दोन मुलगे. पैकीं मुलींना ती दर मंगळवारीं भेटे व मुलांना शुक्रवारीं भेटे.

" आणि तिची सारी संपत्ति...मला सांगायला फार लाज वाटते वकीलसाहेब, असल्या अनीतिमय आचरणांतच माझ्या पत्नीच्या दोन लाखांच्या इस्टेटीची निपज झाली आहे !

" आतां आपणच मला सांगा वकीलसाहेब, मी घटस्फोट मागूं नये तर काय करावें ? "

वकीलसाहेबांनीं गंभीर चर्या करून शांतपणें उत्तर दिलें, " त्यापेक्षां तीं चारही मुलें आपलींच आहेत असें म्हणा म्हणजे झालें."

# सुकलेली माळ

ग्रीष्मऋतु संपून नुकताच पावसाळ्याला आरंभ झाला होता. आकाशांत निळ्या काळ्या मेघांची मस्तीला आलेल्या हत्तींप्रमाणें मारे झुंज चालली होती. नगरांत तेव्हां मेघमेळ्याची जत्रा होती. त्या जत्रेचें उपास्यदैवतही मेघच आणि आकाशांतही मेघावडंबरच माजलें होतें. जणुं काय भूतलावर उत्सव करणाऱ्या आपल्या भक्तांच्या आळवणीला भाळून मेघराज भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं नटून थटून आकाशांत येऊन उभा राहिला होता.

मेघमेळ्यांत यात्रेकरूंची बेसुमार गर्दी होती. दूरदूरचे नानाप्रकारचे व्यापारी नाना प्रकारच्या वस्तू घेऊन जत्रेंत दुकानें मांडून बसले होते. निरनिराळ्या प्रकारचे खेळ, नाटक तमाशे वगैरे करमणुकीचे खेळ खेळणाऱ्या कलावंतांचीही तेथें रेलचेल होती. यात्रेकरू तर इतके होते कीं तेथें मुंगीलाही रीघ नव्हती.

घटकाभर जिवाची करमणूक करावी म्हणून मीही मेळा पहावयाला गेलों. तेथें एका फुलवाल्याच्या दुकानापाशीं जाऊन मी माझ्या आवडत्या हिरव्या-चाफ्याची चौकशी करतो आहे तोंच एक सुंदर बालिका येऊन माझ्यापाशीं उभी राहिली. तिला पाहतांच मला हिरवा चांफा विकत घेण्याचा विसर पडला. मी तेथून जवळच एक जो बकुळीचा वृक्ष होता त्याखालीं जाऊन उभा राहिलों व तेथून त्या सुंदर बालिकेचें सौंदर्य आतुरतेनें न्याहाळूं लागलो. ती वर्णानें गोरीपान होती. तिचे नेत्र हरिणीसारखे होते, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ती एक दृष्ट लागण्यासारखी सुंदर तरुण बालिका होती.

ती लावण्यवती फुलांच्या माळा विकीत होती. तिच्या डाव्या हाताच्या मनगटावर आधारून ठेवलेल्या बऱ्याचशा माळा होत्या; त्या भराभर विकल्या जात होत्या. मीं तिच्याकडे पाहिलें तेव्हां त्या तरुणीच्या हातीं फक्त चारच माळा विकावयाच्या शिल्लक राहिल्या होत्या. इतक्या झपाट्यानें माळा

विकल्या जाण्याचें कारण त्या माळांची किंमतही फार नव्हती. पैशाला माळा दोन.

पण मनुष्यस्वभावाची अशी मौज आहे कीं, मनुष्याला एखादी वस्तु कितीही स्वस्त मिळाली तरी ती आणखी स्वस्त मिळावीशी वाटते. आणि ही सारी काटकसर व घासाघीस बिचाऱ्या गरजू गरिबांशीं सौदा करतांनाच आठवते. गरिबांचे काळ जगांत सर्वच असतात. ती बालिका माळा विकीत होती तोंच एक ऐटबाज धटिंगण गर्दींतून पुढें आला आणि एक पैसा तिच्या हातावर फेंकून जबरदस्तीनें तीन माळा घेऊन गेला. बिचाऱ्या बालिकेच्या हातांतील माळांची जोडी तुटली व एकच माळ शिल्लक राहिली. ती अगदीं रडकुंडीला आली. आतां ती उरलेली एकच माळ कोणी विकत घेणार नाहीं आणि ती वायां जाऊन आपला तोटा होईल म्हणून ती इतकी दुःखी झाली होती.

तोंच दुरून एक सभ्यसा गृहस्थ येतांना त्या बालिकेला दिसला. ती लगेच चार पावलें जाऊन त्याला म्हणाली, "दादा, चमेलीची माळ विकत घेतां का ?"

"नको." असें तुसडेपणानें उत्तर देऊन तो गृहस्थ निघून गेला. त्या बालिकेच्या बाकीच्या माळांच्या जोड्या विकल्या गेल्या; पण त्या एका माळेला कोणीच गिऱ्हाइक भेटेना. हां हां म्हणता तिन्हीसांजाची वेळ झाली. एवढ्यांत उन्हाच्या तिरपेनें ती माळ बरीच कोमेजून गेली होती आणि यात्रेकरूंची गर्दीही पांगली होती. मी अजून तेथेंच यात्रेची मौज पाहात हिंडत होतों. इतक्यांत कसलासा एक कोमल मंजूळ स्वर माझ्या कानीं आला. मी मागें वळून पाहतों तों ती बालिका माझ्यापाशीं येऊन हातांतील विजोडाची एक माळ पुढें करून मला विचारीत होती, "दादा, चमेलीची माळ घेतां कां ?"

मला त्या बालिकेच्या चिकाटीचें व धीटपणाचें कौतुक वाटलें. तिला निराश करूं नये म्हणून मी खिशांत हात घालून पैसा शोधूं लागलों. पण सुटा पैसा खिशांत एकही नव्हता. आतां काय करावें ? खिशांत पैसे मुळींच नव्हते असें नव्हे; रुपाया होता. पण बंदा. अखेर तोच रुपया बालिकेच्या हातीं

देऊन म्हटलें. "ही घे तुझ्या माळेची किंमत" आणि तसाच ती माळ घेऊन पुढें चालूं लागलों.

अंमळशानें मीं मागें वळून पाहिलें; तों ती बालिका तेथेंच उभी राहून तटस्थपणानें माझ्याकडे टक लावून पहात होती.

मी घरीं जाऊन पोहोंचलों तों रात्र झाली. त्या रात्रीं मी कांहीं न खातां न जेवतां बिछान्यावर जाऊन पडलों. पण चैन कसें तें पडेना आणि झोंपही येईना. एकसारखी ती सुंदर बालिका माझ्या कल्पनासृष्टींत जणूं माझ्या दृष्टी-समोर तरळत होती. तिच्याकडून विकत घेतलेली अगोदरच कोमेजलेली चमेलीची माळ आतां जरी पुरती कोमेजली होती तरी ती मला इतकी आवडत होती कीं मीं ती एकसारखी कितीदां तरी हुंगली व तिचें एकसारखें चुंबन घेतलें. तेवढ्यानें माझें मन किंचित् शांत झालें व माझा अंमळ डोळा लागला.

पण झोंपेंत तरी काय ! मनीं वसे तें स्वप्नीं दिसे म्हणतात त्याप्रमाणें जागेपणीं माझ्या दृष्टीपुढून दूर न होणारी ती बालिका झोंपेंतही माझ्यासमोर उभी होती. तिनें लाजत लाजत गालांतल्या गालांत हंसत, 'माझ्या जिवाच्या जिवलगा' अशी मला हांक मारली, आणि चमेलीच्या फुलांची एक टव-टवीत माळ माझ्या गळ्यांत घातली. अंमळशानें जागा होऊन पहातों तों काय, माझ्या गळ्यांत चमेलीची माळ नव्हती, व समोर ती बालिकाही उभी नव्हती !

सकाळीं सूर्य उगवतांच मी जो उठलों तो अंमळशानें त्या बालिकेचा शोध करावयाला निघालों. सारं नगर धुंडाळून पालथें घातलें; एखादी लहा-नशीं गल्लीदेखील धुंडाळावयाची ठेवली नाहीं. परंतु त्या बालिकेचा शोध कोठेंच लागेना.

असे आणखी कैक दिवस गेले. माझें धुंडाळणें सारखें चाललेंच होतें. परंतु व्यर्थ. अखेर मी दुधाची तहान ताकावर भागवावी त्याप्रमाणें त्या सुकलेल्या माळेवरच समाधान मानून घेऊं लागलों.

हां हां म्हणतां असें एक वर्ष लोटलें. पुन्हा मेघमेळा आला. त्या जत्रेंत मीं पुन्हा एकदां माझ्या नशिबाची परीक्षा पाहाण्याचें ठरविलें. या वर्षीची जत्रा गेल्या वर्षापेक्षांही भरभराटीद भरली होती. देशोदेशचीं नानापरींच्या

कलाकुसरींची दुकानें या वर्षीं चिक्कार आलीं होतीं. आणि यात्रेकरूही अनपेक्षितपणें दूरदूरच्या प्रांतांतून तेथें लोटले होते. जिकडेतिकडे आनंदी-आनंद होता. यात्रेंत हरतऱ्हेच्या मालाची विक्रीही धुमधडाक्यानें सुरू होती. परंतु माझें मन कांहीं केल्या त्यांत रमेना; माझे आशेला आलेले डोळे निराळ्याच आवडत्या वस्तूचा शोध करण्यांत गुंतलेले असल्यामुळें सभोंवारच्या आनंदी-आनंदाचें त्यांना काय होय ? माझ्या हृदयांत जी एक सौंदर्यमूर्ति गेल्या वर्षींच्या मेघमेळ्यापासून अधिष्ठान मांडून बसली होती. तिचा शोध मी करीत होतों. मी जत्रेतला प्रत्येक कोनाकोंपरा अगदीं लक्षपूर्वक तीन तीन वार धुंडाळून पाहिला, परंतु कोठें कांहीं पत्ता लागेना. अंत:करणांतल्या सौंदर्यमूर्तीचें सजीव प्रतिबिंब कोठेंही दिसेना.

अशा स्थितींत सायंकाळ झाली. यात्रेकरू आपपाल्या घरीं जाऊं लागले. जत्रेंतील गर्दी ओसरूं लागली.

" आतां कांहीं ती मला भेटत नाहीं. उगीच तिष्ठत हिंडुन काय उपयोग असें म्हणून मीहीं माझ्या घरच्या वाटेकडे वळलो.

पण आमवास्येच्या रात्रीं आकाशांत लुकलुकणाऱ्या तारकांप्रमाणें माझ्या निराशेंतही आशा डोकावत होती. मनांत म्हटलें, गेल्या वर्षीं प्रथम ज्या ठिकाणीं ती बालिका मला भेटली, तिथें जाऊन पहावें तरी ! त्या विचारसरसा मी भग्न हृदयानें त्या जागीं गेलों व एका झाडाखालीं स्वस्थ बसलों आतां-मात्र मला रडूं कोसळलें.

तशाच स्थितींत रात्र पडली. जत्रेंतील गर्दी अगदी विरळ झाली. मी शून्य चित्तानें विचार करीत त्याच जागीं बसलों होतों; जो तो आपापल्या घराकडे जात असतांना मी एखाद्या भ्रमिष्टासारखा तेथें कां बसलों होतों हें माझें मलाच कळेना.

तोंच अकस्मात् एक कोमल सुस्वर माझ्या कानीं आला. मान वळवून पाहतों तों ती बालिका माझ्या बाजूला उभी.

" दादा, तुम्हीसुद्धां देवाला माळा वाहून या कीं ! " असें म्हणून तिनें आपल्या हातांतील बऱ्याचशा माळा माझ्या हातीं टाकल्या.

मी त्या तशाच झेलून सगळ्याच्या सगळ्या उलट त्या बालिकेच्या कंठीं

घातल्या. त्याबरोबर ती एकदम चकित होऊन माझ्याकडे पाहून उद्गारली, " हें काय केलेंत दादा ? "

मी हंसत हंसत तिला म्हणालों, " मला माझ्या देवतेला माळा वहायला तूंच सांगितलेंस ना ? "

" असें तुम्हांला करायचें होतें तर अगोदर मला कां नाहीं सांगितलें ? या माळा गुंफतांना मला किती श्रम पडले होते याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ? " ती बालिका किंचित् रोषानें माझ्याकडे पहात म्हणाली.

" बरी आठवण झाली. " मी माझ्या खिशांतली ती सुकलेल्या फुलांची माळ काढून हातीं घेतली व तीही लगेच तिच्या कंठीं घालून म्हटलें, " ही तुझी एक माळ माझ्यापाशीं होती ती आपली घे. "

× × ×

ती माळ पाहून बालिका ओशाळून गालांतल्या गालांत हंसली. तिची कोमल दृष्टि तेव्हां माझ्या पायाकडे वळली होती. वर न पाहातां तिनें आपल्या गळ्यांतल्या दागिन्याच्या माळेकडे हात नेले व ती तोडून तिच्यांतून एक रुपया काढून तो माझ्या हातीं देत म्हणाली, " हा घ्या तुमचा रुपया."

त्या रुपयाला नेढ्याचा डाग होता. तो तिनें गळ्यांतल्या माळेंत सोन्याच्या पुतळीसारखा गुंफला होता. मी रुपयाकडे निरखून पहात विनो-दानें तिला म्हणालों, " माझ्या रुपयाला हा डाग नव्हता.

ती पुन्हां गालांतल्या गालांत हंसत अनुरागपूर्वक उत्तरली, " पण माझी माळ तरी सुकलेली कुठें होती ? "

आजूबाजूला तेव्हां कोणीही नव्हतें. मीं त्या बालिकेला हृदयाशीं कवटाळून तिच्या ओठांना माझे ओठ भिडविले आणि तेव्हां तिनेंही मला प्रतिकार केला नाहीं.

आणखी काय सांगूं ?

# मोपासाँच्या आणि इतर गोष्टी

## कृष्ण कमळ

सभोंवार परोपरींच्या फलपुष्पांनीं बहरलेलें कुंजवन; त्याला त्याच्या सौंदर्यामुळें तें नांवही पण अगदीं शोभून दिसे. कुंजवनाच्या मध्यभागीं राजेबहाद्दरांचा राजप्रासाद या नांवाला शोभणारा भव्य, शोभिवंत व सर्व प्रकारच्या आधुनिक सुखसोयींनीं समृद्ध असा बंगला होता. बंगल्याच्या अर्थात् कुंजवनाच्या आवारांत एक मोठा बकुळीचा वृक्ष होता, व त्या वृक्षाच्या आधारानें एक कृष्णकमळीची वेल वाढली होती.

बकुळीच्या वृक्षाला फुलावयाला व आपला सुगंध दशदिशांना पसरून द्यावयाला ऋतुकालाचें बंधन असे. पण गरीब आणि श्रीमंत अशांच्या जगांतील प्रेमळ श्रीमंतांच्या अंगीं श्रेष्ठपणामुळें जो लहरीपणा आलेला असतो तो प्रसंगीं चंद्रावरच्या कांतीप्रमाणें खुलून दिसतो, त्याप्रमाणेंच बकुळीच्या वृक्षाचा तो लहरीपणाही कोणाला बोचत नसे. असला लहरीपणा गरजू गरिबांना शोभतही नाहीं व झेंपतही नाहीं. म्हणूनच ते बिचारे कृषिकर्म, सेवा, जें काय कर्तव्य करावयाचें तें सूर्योदयापासून सूर्यास्तापावेतों रोज करीत असतात. त्यांचें श्रमसौंदर्य कोणा कनवाळूचें मन आपणाकडे वेधून घेणार नाहीं? तशीच बकुळ वृक्षाच्या आधारानें वाढलेली कृष्णकमळीची वेल सामर्थ्ययुगांतील आपली दुर्बलता ओळखून मीही आपल्या आधारस्तंभाप्रमाणें हंगामांतच फुलेन असा लहरीपणा न दर्शवितां सदाकाळ बारा मास फुले. त्या फुलांनीं त्या वेलीची

शोभा तर खुलून दिसेच; पण त्या वेलीच्या सान्निध्यांत बकुळीचा वृक्षही त्या शोभेमुळें सुंदर दिसे. तो वृक्ष कोणीं लावला होता नकळे; पण ती वेल मात्र सुधेनें लावली होती.

कुंजवनाच्या आवारांत त्या बकुळीच्या वृक्षाखालींच एक दुपाखी कौलारू झोंपडी होती. त्या झोंपडींत राजेबहाद्दरांचा पुजारी विश्वेश्वर आपली एकुलती एक कन्या सुधा इच्यासह रहात असे. सुधा जन्मतःच फार तरतरीत व देखणी होती. पण ती बिचारी वयाच्या सहाव्या वर्षीच मातृहीन झाली होती. तिच्या आईनें आपल्या तिसऱ्या बाळंतपणांत आपल्या उपजत्या अर्भकासह इहलोकाचा त्याग केला होता. तेव्हांपासून सुधेच्या पालनपोषणाचा सर्व भार विश्वेश्वरावरच पडला होता. परंतु तो भार त्याला आपल्या धन्याच्या प्रेमळ वृत्तीमुळें फारसा जाणवला नाहीं. राजेसाहेबांचा श्यामकान्त हा एकुलता एक मुलगा असल्यानें व तो सुधेपेक्षां वयानें चारच वर्षांनीं मोठा असल्यानें सुधा अमळ मोठी बोलती चालती होतांच त्या दोघांची चांगली मैत्री जमली; व ती त्याच्या वयाबरोबर वाढतच गेली. सुधेनें लावलेल्या कृष्णकमळीवर जशीं फुलें फुलूं लागलीं, तशीच त्या दोघांच्या मैत्रीवर प्रेमाची फुलवंती फुलूं लागली. पण—!

बकुळीच्या आधारानें वाढलेली कृष्णकमळीची वेलही बकुळीच्या वृक्षावर वाढून त्याच्या फांद्यांना लपेटून अगदीं एकजीव झाल्यासारखी दिसे. पण म्हणून कांहीं त्या वेलीवर कधीं बकुळें फुललीं नाहींत, किंवा बकुळीच्या फांदीला कृष्णकमळें उगवलीं नाहींत. वनस्पतिशास्त्राच्या दृष्टीनें दोन्ही विजातीय वनस्पति त्या, त्याचें इतकें दृढ मीलन आपोआप कसें होणार ?

श्यामकान्तही तरुण दिसूं लागला, सुधा उपवर झाली, तिचें सौंदर्यही खुलून दिसूं लागलें. पण तो पडला श्रीमंत आणि ती पडली गरीब ! तो धनी आणि ती सेवक. (परस्पर प्रेमानें त्यांचीं मनें एकजीव झालीं तरी वैवाहिक जीवनाच्या दृष्टीनें त्यांच्या जीवनाची एकजीवता कशी होणार)?

श्यामकान्ताला वाटत होतें कीं सुधा आपली धर्मपत्नी व्हावी. सुधेलाही तसेंच वाटत होतें. पण कुठें जहागीरदारी श्रीमंती आणि कुठें त्या जहागिरदाराच्या पुजाऱ्याचें दारिद्र्य ! राजेबहाद्दराच्या ती गोष्ट स्वप्नींही

आली नाहीं; व विश्वेश्वरानें स्वप्नांतही तें वैभव आपल्या एकुलत्या एका सुधेसाठीं अपेक्षिलें नाहीं.

कुंजवनाच्या पलीकडे सुमारें एका मैलावर राजेबहाद्दरांच्या मालकीची एक मोठी आंबराई होती. तिचें नांव आंबराई असलें तरी तिच्या अर्ध्या भागांत फुलझाडें लावण्यांत आलीं होतीं. ती आंबराई दरसाल आंब्यांच्या हंगामांत निराळी व फुलांच्या बारमहाच्या उत्पन्नासाठीं निराळी अशा दुबार खंडानें दिली जात असे.

अलीकडे ती आंबराई रामनाथराव नांवाच्या एका शेतकरीपेशाच्या ब्राह्मणानें मक्त्यानें घेतली होती; व फुलझाडांची नवी लागवड करतांना रामनाथरावांचा मोठा मुलगा महेश्वर यानें राजेबहाद्दरांच्या कुंजवनातील अनेक फुलझाडाबरोबर कृष्णकमळीच्या वेलीचींही कांहीं कलमें नेऊन त्या बागेंत लावलीं होतीं.

राजेबहाद्दरांच्या मध्यस्तीनें विश्वेश्वरांनीं महेश्वराशीं सुधेचें लग्न ठरविलें; त्याच सुमाराला श्यामकान्ताचें लग्न मध्यप्रांतातील एका जहागीरदाराच्या मुलीशीं ठरल्यामुळें एकाच मंडपांत दोन्ही लग्नसमारंभ पार पडले. विश्वेश्वरांना सुधेच्या लग्नासाठीं निराळा खर्च कांहींच करावा लागला नाहीं.

श्यामकान्त आणि सुधा यांचें जरी एकमेकांवर अत्यंत प्रेम होतें, तरी मृगजळाच्या मागें लागण्याचा अविचार त्यांनीं केला नाहीं. मनांतून त्याना अत्यंत वाईट वाटलें खरें; पण जें दुःख टाळतां येण्याजोगें नाहीं, तें सहनच केलें पाहिजे, इतका विवेक त्या दोघांच्याही अंगीं असल्यानें त्यांचें अंतःकरणातील प्रेम अंतःकरणांत नंदादीपाच्या ज्योतीप्रमाणें सदैव जागृत राहूनही त्यांचे अलग अलग संसार जगाच्या रहाटीप्रमाणें सुरू झाले.)

सुधा आपल्या सासरीं रहावयाला गेली.

त्याच उन्हाळ्यांत कुंजवनातील कृष्णकमळीची वेल पाण्याच्या प्रभावामुळें सुकली, व तिच्याऐवजीं त्या वेलीचें कलम पुन्हा आणून लावण्याची आवश्यकता कोणाला वाटली नाहीं.

तरीपण राजेबहाद्दरांच्या देवपूजेसाठीं आंबराईतून रोज जीं फुलें कधीं महेश्वर तर कधीं सुधा यांच्याकडून तोडून देण्यात येत असत, त्यांत कृष्णकमळें

असत; व तीं कृष्णकमळें रोज भक्तिभावानें देवाला अर्पण करण्यांत शामकान्तालाही आनंद होत असे.

श्यामकान्त फुलांच्या परडींतील गुलाब, शेवंती, सोनचाफ्याचीं सुगंधी फुलें तशींच ठेवून रोज कृष्णकमळ तेवढें अचूक शोधून काढून देवांना वाही, तें त्याच्या पत्नीनें अनेक वेळां पाहिलें असेल. पण असें तो कां करतो ही शंका तिच्या मनाला कधींच शिवली नाहीं. त्याप्रमाणेंच सुधा धन्याच्या बंगल्यावर पाठविण्याच्या फुलांत रोज नियमानें कृष्णकमळें तोडून घालावयाला कां चुकत नाहीं, हें महेश्वराच्याही कधीं ध्यानीं आलें नाहीं.

## २

लग्नानंतर दोन महिने लोटले, व एके दिवशीं श्यामकान्त अचानक आंबराईत आला. तेथें महेश्वर व त्याचा पिता हे दोघे बागेला पाणी देत असलेले पाहून थोडी वरवर विचारपूस करून तेथून तो जो बाहेर पडला, तो थेट त्यांच्या घरीं गेला.

सुधा तेव्हां गोठयांतील गुरांना पाणी पाजीत होती. त्या दोघांना एकमेकांना पाहून काय वाटलें तें त्यांचें त्यांनी माहित. त्यांनीं तें एकमेकांनाही बोलून दाखविलें नाहीं.

श्यामकान्त थोडा वेळ स्तब्ध उभा होता, तो अगदीं हळू–सुधेला ऐकूं जाणार नाहीं, किंबहुना त्याच्या स्वतःच्या कानांनाही नीटसा ऐकूं जाणार नाहीं इतक्या हळू एक उसासा सोडून उद्गारला, " सुधे ! मी आज रात्रीं विलायतेला पुढील अभ्यासासाठीं जावयाला निघणार आहें. तुला माझी आठवण रहावी म्हणून मी तुला कांहीं आतां देणार आहें तें तूं घ्यावयाचें नाकरतां कामा नये. माझ्यावर तुझें खरें प्रेम आहे कीं नाहीं याची हीच कसोटी आहे."

लग्नापूर्वीं श्यामकान्तानें सांगावें आणि सुधेनें ऐकावें असाच परिपाठ होता. सुधेनें कांहीं क्षण डोळे मिटून घेऊन विचार केला. तेव्हां तिचा ऊर धडधडत असल्याचें वक्षस्थलावरील तिच्या पदराच्या मंद हालचालीवरून श्यामकांताच्या ध्यानीं आलें.

सुधेनें पदरानें डोळ्यांच्या कोंपऱ्यांत ओळंबणारीं आसवें पुशीत विचारलें, " आपण मला काय देणार आहां ?"

"ही घे माझी आठवण!" असें म्हणून श्यामकान्तानें आपल्या कोटाच्या खिशांतून एक लहानशी मखमालीची डबी बाहेर काढून सुधेपुढें केली.

सुधेनें ती घेऊन उघडून पाहिली, तों त्यांत एक तेजस्वी हिऱ्याची आंगठी तिला दिसली. त्या हिऱ्याचें तेज पाहून तिला वाटलें कीं हा हिरा भारी किंमतीचा असावा.

" काय किंमत आहे या आंगठीची ?" सुधेनें विचारलें.

" बाराशें रुपये. पण त्या किंमतीशीं तुला काय करावयाचें आहे ?" श्यामकान्तानें हंसत म्हटलें, " ही येत्या भाऊबीजेची भेट म्हणून समज, म्हणजे झालें."

" पण......"

" काय ? तूं माझी आठवण स्वीकारीत नाहींस ? माझा तूं प्रेमळ भाऊ या नात्यानेंही स्वीकार करायला तयार नाहींस ?"

" तसें नव्हे..."

" तर ?"

" आम्ही गरीब माणसें. एक तर इतकी बहुमोल आंगठी माझ्या हातीं शोभणार नाहीं. दुसरें, भाऊबिजेला आपण इथें नाहीं. ही भाऊबिजेची देणगी असें मी घरांत कोणत्या तोंडानें सांगू ?" सुधा पुन्हा पदरानें डोळे पुशीत पुशीत म्हणाली.

श्यामकान्तानें गंभीरपणानें अंमळ विचार करून हळूच आपल्या दांताखालीं ओंठ चावून म्हटलें, "पण तुला माझी आठवण आपणापाशीं असावी असें वाटतें ना ?"

" वाटून उपयोग काय ? स्त्रिया परतंत्र असतात; त्या अशा बाबतींत मुक्या असतात."

" मग मी एक उपाय सुचवितों."

" सुचवा काय तो."

" मीं ज्या जवाहिऱ्याकडून ही आंगठी आज खरेदी केली, त्याच्यापाशीं पुन्हा जातों व त्याला सांगून ठेवतों कीं, अमक्या नांवाचीं नवरा–बायको आंगठी घ्यायला तुझ्या दुकानीं उद्यां अगर परवां येतील, त्यांना तूं हीच आंगठी शिफारस करून दाखव, व तिची किंमत चाळीस पन्नास रुपयांपेक्ष

जास्त सांगूं नकोस किंवा घेऊं नकोस. तो प्रेमचंदशेट माझा चांगला मित्र आहे. तो बिनबोभाटपणें मी सांगेन तसें करील. तूं मात्र एक करायचें, महेश्वरापाशीं आपणाला एक नकली हिऱ्याची चांगलीशी पण बेताच्या किंमतीची आंगठी विकत घ्यायची आहे असा हट्ट धरायचा. तो तुझा एवढा हट्ट देखील पुरवणार नाहीं का ?"

"पुरवतील. पण......"

"पैशांची अडचण ना ? ती मी परस्पर भागवितों. आज महेश्वर मला स्टेशनवर पोंचवायला येईलच. तेव्हां मी त्याला पन्नास रुपये देणार आहें."

इतक्यांत कोणीतरी सुधेला हांक मारूं लागलें. तेव्हां श्यामकान्तानें आपलें संभाषण आवरतें घेऊन जड अंतःकरणानें सुधेचा निरोप घेतला.

रात्रौ श्यामकान्ताला स्टेशनवर पोंचवायला गेलेला महेश्वर गाडी सुटल्यावर माघारा आला. रात्रौ एकान्तांत सुधेची भेट झाल्यावर तो आनंदानें तिला म्हणाला, "धाकट्या धन्यांनीं जातांना पन्नास रुपये देणगी म्हणून मला दिले आहेत. यांचा तुला कांहीं तरी मनाजोगा दागिना करावा असें माझ्या मनांत आहे. तुला कोणचा दागिना आवडतो तो सांग, म्हणजे आपण उद्यां जाऊन विकत आणूं."

सुधा म्हणाली, "आपण मला हिऱ्याची आंगठी घेऊन देणार का ?"

"हिऱ्याची आंगठी ? ती इतक्या थोड्या किंमतींत कशी येईल ?"

"खऱ्या हिऱ्याची नाहीं तर एखाद्या चांगल्या नकली हिऱ्याची घेतली तरी चालेल. प्रेमचंदशेटजींच्या दुकानीं अशा आंगठ्या फारच चांगल्या मिळतात म्हणे. मग आपण मला या वर्षी दिवाळीसाठीं नवीन दागिना नाहीं केला तरी चालेल."

तो संकेत पतिपत्नींत ठरला.

दुसऱ्या दिवशीं महेश्वराबरोबर सुधा प्रेमचंद जवाहिऱ्याच्या दुकानीं गेली. प्रेमचंदानें त्यांना तेव्हांच ओळखलें, व विचारलें, "कितीपावेतों आंगठी पाहिजे आपणांला ?"

"फार फार तर साठ रुपयांपावेतों." महेश्वर म्हणाला. त्यानें मनांत विचार केला कीं सवदा ठरवतां ठरवतां आंगठी आपण पन्नासांपावेतों

मागूं. त्यांतूनही मनाजोग्या आंगठीसाठीं थोडी जास्त किंमत पडली तरी द्यावयाची या विचारानें त्यानें बरोबर पाऊणशें रुपये घेतले होते.

" ही एक चांगली आंगठी माझ्यापाशीं आहे. हिची मूळ किंमत आहे शंभर रुपये. परंतु आठ दिवसांपूर्वीं ती ज्या एका गृहस्थानीं एथूनच शंभर रुपयांना विकत घेतली होती, त्यांना पैशाची अत्यंत गरज पडल्यामुळें त्यांनीं ती पन्नास रुपयांपावेतों जास्तींत जास्त तोटा सोसून पण शक्य तों आजच्या आज विकण्यासाठीं माझ्याकडे आणून दिली आहे. आपण ती बेलाशक घ्या पाहिजे तर. कुठेही विचारा, तिची किंमत खऱ्या हिऱ्याच्या तोलानें केली जाईल इतका हा खडा नकली असूनही किंमती आहे " असें म्हणून प्रेमचंदशेटनीं ती पूर्वनियोजित आंगठी काढून हंसत महेश्वराच्या हातीं दिली.

सुधेनें ती आंगठी ओळखली, व पसंतही केली.

महेश्वरानें बराच वेळ हो नाहीं करतां करतां अखेर पन्नास रुपयांना ती आंगठी सुधेच्या आवडीमुळें खरेदी केली. तेव्हां सुधेच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं ती पंधराशें रुपयांच्या किंमती हिऱ्याला भाळली नव्हती; असल्या कितीतरी आंगठ्या तिनें श्यामकांताच्या प्रेमावरून ओवाळून टाकल्या असत्या. ती श्यामाकांताच्या प्रेमाची अक्षय स्मृति आपल्या चिरसहवासांत असावी ही तिची जिवाभावाची उत्कंठा होती.

" ह्या आंगठीवर नांव घालतां येईल का ? " महेश्वरानें पन्नास रुपये मोजून देतां देतां विचारलें.

" हो ! कोंदणाच्या खालच्या बाजूला नांव घालतां येईल. नुसतें सोनेंच तिचें एक तोळा आहे. आणि कोंदणाची बैठकही जाड व रुंद आहे. " प्रेमचद म्हणाला.

जवाहिराच्या दुकानांतून महेश्वर आंगठी घेऊन बाहेर पडला. तो सुधेला म्हणाला, " तूं आतां घरीं जा. मी हिच्यावर माझें नांव घालून आणतों. म्हणजे तुला आवडेल कीं नाहीं ? कीं तुझें नांव घालूं ? "

" माझें कशाला ? आपण आपलेंच नांव घालून आणावें. " सुधा म्हणाली, व घरीं गेली.

दोन प्रहरच्या भोजनाची सर्व सिद्धता करून सुधा महेश्वराची मार्गप्रतिक्षा करीत बसली होती. श्यामकांत दूरदेशीं गेल्यामुळें त्याचें दर्शन आपणाला

आतां कैक वर्षे घडणार नाहीं, या विचारानें तिचें हृदय जितकें विद्ध होत होतें, तितकाच ती श्यामकांताच्या भावी उत्कर्षाचीं मनोराज्यें मनांत उभारून मनाचा विरंगुळा करीत होती. आपल्या श्यामकांताच्या निष्पाप प्रेमाची स्मृति म्हणून ती आंगठी आपण मरेतों आपल्या हातांत अक्षयीं घालून ठेवणार असें स्वतःशीं हितगुजत असतां आज घरच्या देवपूजेसाठीं फुलें तोडावयाचीं आंगठीच्या नादांत राहून गेलीं याची आठवण तिला झाली. ती तशीच आंबराईत गेली व फुलें तोडूं लागली. जातांना ती बरोबर आपल्या नवीन व्यालेल्या गाईच्या वासराला कोंवळ्या दुर्वा चारण्यासाठीं घेऊन गेली.

सुधा फुलें तोडीत होती व वासरूं तिच्या आगेंमागें चरत होतें. सुधेच्या मनांत विचार आला, आज कांहीं आपला श्यामकांत कृष्णकमळें देवांना वाहावयाला इथें नाहीं. आणि तो इथें नाहीं म्हणून धन्याच्या घरीं देवपूजेसाठीं पाठविण्याच्या फुलांत आज तिनें मुद्दामच कृष्णकमळें तोडून घातलीं नव्हतीं. तिचा सासरा आज सकाळींच पूजेचीं फुलें तोडून धन्यांच्या घरीं पोंचवून परस्पर गांवाच्या वाडीवर कांहीं कामासाठीं निघून गेला होता. तो सायंकाळपावेतों येणार नव्हता.

## ३

आजपासून श्यामकान्ताची आठवण म्हणून त्याच्याऐवजीं आपण रोज कृष्णकमळें देवाला वहावयाचीं, असा निश्चय करून सुधा इतर फुलांबरोबर कांहीं कृष्णकमळेंही तोडून परडींत घेण्यासाठीं त्या वेलीकडे जाऊं लागते तोंच मागाहून महेश्वरानें हाक मारली, " सुधा ! "

सुधा फुलांची परडी तशीच हातीं घेऊन उत्सुकतेनें महेश्वराला सामोरी गेली.

"सुधा ! तुला आज एक मोठी आनंदाची बातमी सांगावयाची आहे. " महेश्वर प्रसन्न वृत्तीनें हंसत उद्गारला.

" ती काय ? " सुधेनें जास्तच उत्सुकतेनें विचारलें.

" या दिवाळीची देणगी म्हणून तूं नुसती आंगठीच नव्हे तर तिच्या-बरोबर आणखी एकदाणीही मिळविणार.

" ती कशी ? "

" सांगतों ऐक. मी आतां ती आंगठी घेऊन सोनाराकडे तिच्यावर नांव घालायला गेलों, तेव्हां सहज त्याला विचारलें, ही आंगठी केवढ्याला विकत घ्यावी ? त्यानें त्या खड्याची खूप तारीफ करून म्हटलें, आंगठीचा खडा फारच चांगला आहे. पण त्याला किंमत करवेना. त्यानें पुन्हा मलाच विचारलें,तेव्हां मी म्हणालों, दीडशें रुपये किंमत पडली. मनांत म्हटलें, याला किंमत कळते कीं नाहीं पहावी तरी ! त्यावर तो सोनार चांगली मिळाली असें म्हणाला. मी सहज म्हटलें, तो हिरा बनावटीचा नसून खरा आहे; ओळखीमुळें मला ती स्वस्त मिळाली. त्यानें मला ती दोनशें रुपयांना विकत देतां का म्हणून विचारलें. मग मी थोडीच संधी वायां दवडतों ! मीं ती त्याला देऊन हे पहा दोनशें रुपये रोख आणले आहेत. आतां आपण संध्याकाळीं त्याच दुकानांत जाऊन अशीच तुला आवडेल ती दुसरी आंगठी घेऊं, आणि राहिलेल्या पैशांची एकदाणी घेऊं. " असें म्हणून महेश्वरानें रुपयांच्या नोटा सुधेपुढें केल्या.

सुधेनें कोणालाही—स्वतःच्या कानालाही ऐकूं जाणार नाहीं इतक्या हळूं एक निश्वास सोडला, व कांपरें भरलेला हात नोटा घेण्यासाठीं पुढें केला.

सुधेचें वासरूं तेवढ्यांत तिचा डोळा चुकवून कृष्णकमळीचा चारा यथास्थित खात होतें !

# खुनी

त्या खुनी अपराध्याच्या वतीनें एक तरुण वकील न्यायकचेरींत भांडत होता. त्या तरुण वकिलाच्या हातीं आलेला महत्वाचा खटला असा तोच पहिला होता. त्या वकिलानें पुढीलप्रमाणें भाषण केलें.

"...ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो, आपणांसमोर माझ्या पक्षकाराविरुद्ध जो पुरावा आला आहे, तो नाकारतां येण्याजोगा नाहीं, हें मलाही कबूल केलेंच पाहिजे. तथापि, माझा पक्षकार हा एक अब्रूदार, सदाचारी, स्वाभिमानी, प्रामाणिक व पापभीरू असा आपल्या धन्याचा नोकर होता; व असें असतांही त्यानें रागाच्या भरांत आपल्या धन्याचा खून केला. तो कां केला, हें एक अत्यंत अवघड कोडें आहे खरें. परंतु ह्या खटल्याचें मानसशास्त्रदृष्ट्या आपणासमोर विवेचन करण्याची संधी आपण मला द्या, व मग काय निकाल द्यावयाचा तो द्या, अशी आपणाला माझी प्रार्थना आहे.

"माझा पक्षकार मनोहर महाशब्दे हा अब्रूदार व मान्यतेच्या मातापितरांच्या पोटीं जन्मलेला आहे. त्याला गृहशिक्षणही जें मिळालें, तें योग्य असेंच मिळालेलें आहे, त्याचा गुरु एक आदरणीय व विद्वान् गृहस्थ होता. याच्या नसांनसांतून खानदानीपणा व सभ्यपणा खेळत आहे.

"आणि तेथेंच माझ्या पक्षकाराच्या अपराधाचें मूळ आहे. स्वाभिमान व अब्रू हे शब्द आपण आपल्या संभाषणांत अनेकवार उपयोगांत आणतों व ग्रंथांतून वाचतोंही. परंतु त्या शब्दांतील खोल अर्थाची जाणीव दिवसेंदिवस आपणांमधून कमी कमी होत आहे. एखाद्या वास निघून गेलेल्या वाळलेल्या फुलाप्रमाणें त्या शब्दांची अवस्था आतां झाली आहे. तथापि, त्या शब्दांचें खरें सौंदर्य आपणाला पहावयाचें असेल तर आपण खानदानीच्या थोर गणल्या गेलेल्या जुनाट घराण्यांकडे वळलें पाहिजे. त्या लोकांचे भोळे भाव,

त्यांची देवावरची श्रद्धा, त्यांना असणारी दानतीची चाड, त्यांना वाटणारा कुलाभिमान, देशाभिमान, हीं पाहून आपणांला तोंडांत बोटें घालावीं लागतील. ह्या त्यांच्या थट्टेच्या अथवा शिळोप्याच्या गोष्टी नव्हेत, तर तो त्यांचा जणूं श्वासोच्छ्वास आहे असें म्हटलें तरी चालेल.

"कोणताही मनुष्य श्रद्धाळू असल्याशिवाय तो सरळ वृत्तीचा असूंच शकत नाहीं. श्रद्धाळू मनुष्य ढोळस असूनही त्याचे डोळे मिटलेले असतात. श्रद्धा-विश्वास ठेवून वागणें एवढेंच त्याला समजतें. इतरांचें तसें नाहीं. ही आमचीच अवस्था पहा! हें आपलें न्यायग्रह. या न्यायगृहांत प्रत्येकाच्या पापाचा पाढा वाचला जातो. अनेकांच्या अनेक लाजिरवाण्या गोष्टी आपणाला इथें ऐकावयाला मिळतात. आणि आम्ही तरी काय करतो! तर प्रत्येक दुष्कृत्याचा कैवार घेऊन तें दुष्कृत्य नसून सत्कृत्य आहे असें कायद्याच्या आधारें ठरावतो. अगदीं रावापासून रंकापावेतों प्रत्येकाच्या चारित्र्याचे डाग भरल्याबुऱ्या मार्गांनीं धुवून तीं चारित्र्यें समाजांत दाखविण्यासाठीं पुन्हा परीटघडीसारखीं स्वच्छ करून द्यावयाचीं हा आमचा एथला उद्योग. आपण समाजांतील प्रत्येक पातकी स्त्रीपुरुषाला पाठीशीं घालतों, व न्यायाधीशसाहेब, आपणासमोर आमच्या पक्षकारांचा निर्दोषीपणा सिद्ध करतों. आमच्या पक्षकाराचा अपराध किती भयंकर आहे, हेंच आमच्या कायदेपटुत्वाची व थोरपणाची मोजदाद करण्याचें माप होय. अशा आमच्या ठायीं श्रद्धा व विश्वास असणें शक्यच नाहीं. समाजांत अगदीं उच्च स्थानापासून नीच स्थानापावेतों बद्दानत व अनीति कशी धो धो वाहात आहे याचे देखावे रोज रोज प्रत्यक्ष पाहून आमची दृष्टि मेलेली असते. वस्तुमात्राचा नाश कसा होतो अथवा त्यांची खरेदी विक्री कशी होते, मोठमोठे बंगले, जमीनजुमले, ऑफिसें, पदव्या वगैरेंची मोलानें देवघेव कशी चालते, हें आपणाला नित्य दिसतें. मानासाठीं अथवा याहीपेक्षां स्पष्ट बोलावयाचें तर एकाद्या सुंदर तरुणीच्या गोड साखरचुंब्यासाठीं संपत्तीची खैरात करणारे समर्थ लोक आपणाला नेहमीं दिसतात. आमचा हा धंदाच असा आहे कीं, तो आम्हांला अज्ञात अशी कोणतीच गोष्ट ठेवीत नाहीं, अथवा कोणाहीविषयीं विश्वास आमच्या मनांत उत्पन्न करूं शकत नाहीं. कारण आमच्यापुढें जीं माणसें येतात तीं कोणत्या तरी निमित्तानें इतरांच्या संशयाला पात्र झालेलीं

असतात. एरव्हीं तीं अदालतीची पायरी कशाला चढतील ? अशा स्थितींत आजच्या ह्या माझ्या पक्षकारासारखा एखादा श्रद्धाळू मनुष्य आपल्या श्रद्धेसाठीं व विश्वासासाठीं स्वतःच्या प्राणांचें बलिदान करण्याला सज्ज असलेला पाहून आम्हांला अचंबा वाटतो. कारण ती नेहमींच्या परिचयाची गोष्ट नाहीं !

"सभ्य गृहस्थ हो, आपण सर्वजण अगदीं धुतल्या तांदळासारखे शुद्ध व चारित्र्यशील लोक आहों. कारण आम्हांला अन्याय खपत नाहीं, आणि आम्हीं स्वाभिमानाला जागतों. परंतु आमचें अंतःकरण जर कोणीं मानसशास्त्रज्ञानें धुंडाळून पाहिलें, तर तेथें ह्या माझ्या पक्षकाराच्या अंतःकरणांत आहे तशी श्रद्धा, विश्वास व स्वाभिमान यांचा मात्र लवलेशही आपणांला आढळणार नाहीं.

"हें सर्व यापेक्षांही विशद करण्यासाठीं मला माझ्या पक्षकाराची कर्मकथा आपणांसमोर निवेदन केली पाहिजे.

" या माझ्या पक्षकाराचा जन्म व त्याचें सारें बाळपण–सारें आयुष्य अशाच वातावरणांत गेलें आहे कीं जेथें प्रत्येक मानवी कृतीला सत्यासत्याची कसोटी लावली जाते. सत्य कोणतें आणि असत्य कोणतें हें ओळखण्याचें बाळकडूच माझ्या पक्षकाराला पाजण्यांत आलें आहे असें म्हणाना ! याचा पिता एक अगदीं सामान्य मनुष्य होता. उच्चासनावरून जगाला नीतिधर्माची शिकवण देणारा थोर वंदनीय माणूस तो कांहीं नव्हता. त्यामुळें त्याला सामाजिक गरज म्हणून कोणत्याही प्रकारच्या उच्चनीच भावनेची जगांतलि इतर थोर गणल्या जाणाऱ्या लोकांप्रमाणें जाणीव नव्हती.

" असाच त्या गृहस्थाचा सारा जन्म जाऊं लागला. तो श्रद्धाळू, विश्वासू, पण मीं अगोदर सांगितल्याप्रमाणें कोत्या विचारांच्या नीतिधर्माच्या अगडबंब तत्त्वांची जगाला गवासणी घालूं न शकणारा असाच लहानाचा मोठा झाला.

" वयाच्या बाविसाव्या वर्षीं त्याची पत्नी–त्याच्या नात्यांतीलच, व स्वभाव आणि मनोवृत्ती यांनीं थेट त्याच्यासारखीच–त्याला शोभणारी लाभली. परमेश्वरावर भक्तांची श्रद्धा असावी तशी तिची तिच्या पतीवर त्या गृहस्थावर श्रद्धा होती. तात्पर्य, अशी तुल्यगुण धर्मपत्नी त्याला मिळाली,

हें त्याचें मोठेंच भाग्य होय, व तो तसें मानीही. तथापि इतकी प्रेमळ पत्नी देवानें दिली म्हणून त्या गृहस्थाला इतर निकटच्या नातलगांचा विसर पडला होता असें मात्र नाहीं. त्याची त्याच्या जन्मदात्या आईच्या ठायीं इतकी अलोट श्रद्धा होती कीं निःसीम भक्त आपल्या उपास्यदैवताच्या ठायींच तितकी अलोट श्रद्धा ठेवूं शकेल. त्याच प्रेमांतला–भक्तींतला–श्रद्धेंतला वांटा त्यानें आपल्या धर्मपत्नीला दिला होता. पण विद्यादानानें विद्याधन ज्याप्रमाणें कमी न होतां वाढतें, त्याप्रमाणेंच त्याच्या प्रेम–भक्ति--श्रद्धेची अवस्था होती. बरें; त्याचें पत्नीवरचें प्रेमही इतकें शुद्ध व उत्कट होतें कीं, त्याच्या लग्नाला वर्षांमागून वर्षे होऊं लागलीं तरी तें ओसरलें म्हणून नाहीं. अहंकाराचा लवलेशही त्याच्या ठायीं नव्हता. शांततेंत, सुखांत व आनंदीआनंदांत त्याचे दिवस जात होते. तो कधींच कुणाला फसवीत नसे, व आपणाला जगांत कोणी फसवूं शकेल–फसवण्याइतके हीन वृत्तीचे लोक समाजांत असतील अशी शंकाही त्याला कधीं येत नसे. ”

“ त्याचें लग्न होण्याच्या सुमारें दोन अडीच वर्षांपूर्वीं आज तो ज्या श्रीमान धन्याचा खून केल्याच्या अपराधामुळें आपणांसमोर उभा आहे, त्याच घनश्यामशेटजींच्या पदरीं ‘दिवाणजी’ म्हणून नोकरीला राहिला होता.

“ ज्युरींतील सभ्यगृहस्थ हो, आपण येथवर मयत घनःश्यामशेटजींची पत्नी, तिचा भाऊ, शेटजींचा धंद्यांतील भागीदार वगैरे सर्वांच्या साक्षी ऐकल्याच आहेत. ही सर्व मंडळी मान्यतेची व विश्वासू आहेत. ह्या सर्वांनीं एकमतानें असेंच कबूल केलें आहे कीं माझा पक्षकार मनोहर महाशब्दे हा अत्यंत आज्ञाधारक, नम्र, वक्तशीर, प्रामाणिक व विश्वासू नोकर होता. त्याच्या ह्या अमोल गुणांकडे पाहून त्याला इतर नोकरांच्याहून विशेष आपलेपणानें वागविण्यांत येई, हेंही पूर्वोक्त मंडळींच्या तोंडून आपणांला कळलेंच आहे. त्याच्याप्रमाणें त्याच्या पत्नीचाही सर्वत्र असाच गौरव होत असे, कारण तीही तशीच एक मानवी देवता आहे असेंच सर्वांना वाटे.

“ पुढें थोड्याच दिवसांत ती बिचारी विषमज्वरानें मृत्युमुखीं पडली. पत्नीच्या निधनामुळें त्याला अतिशय दुःख झालें. पण त्याचा देखावा त्यानें मुळींच केला नाहीं. तो लोकांसमोर ओक्साबोक्शीं रडलाही नाहीं. पण त्या

दिवसापासून त्याच्या नजरेंत व चर्येत परमावधीच्या दुःखाचें प्रतिबिम्ब स्पष्ट दिसून येऊं लागलें.

" आणि त्यानंतर, ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो, एक विचित्र घटना घडून आली. त्याची पत्नी वारली तेव्हां त्याच्या लग्नाला दहा वर्षे होऊन गेलीं होतीं. ह्या दहा वर्षांत त्याला प्रेमळ पत्नीच्या—स्त्रीच्या सुखकर सान्निध्यांत राहाण्याची संवय जडली होती. त्या दहा वर्षांत त्याला जें वैवाहिक सुख त्याच्या पत्नीच्या सहवासांत मिळालें, तें इतकें अनुपम होतें कीं, त्या सुखाच्या अभावीं त्याला विधुरावस्थेंत चुकल्या चुकल्यासारखें वाटणें अगदीं स्वाभाविक होतें.

"अशा मनोव्यथेंत तो असतांनाच त्याच्या कचेरीजवळ असलेल्या उसाच्या गुऱ्हाळांत रोज जाऊन बसण्याची संवय त्याला लागली. त्या गुऱ्हाळवाल्याची एक तरुण व सुंदर विधवा मुलगी होती. तिला दुकानांत पाहून रस पिण्याऱ्या गिऱ्हाइकाची तिथें नेहमीं अगदीं झुंबड उडत असे. ती मुलगीही गिऱ्हाइकाना रसाचे पेले भरून देताना अशी हंसे व असे हावभाव करी कीं गिऱ्हाइकाच्या मनाला चटका लागून राहावा. तिच्या नेत्रकटाक्षानें कोणी पुरुष घायाळ झाला नाहीं असें कधींच होत नसे.

"मनोहराच्या कचेरींतील बहुतेक नोकर मनोहराप्रमाणेंच त्या गुऱ्हाळांत ती सुंदर तरुणी बसूं लागल्यापासून रस पिण्याच्या निमित्तानें येऊन बसूं लागले होते. त्या प्रत्येकाशीं—बहुतेकाशीं ह्या मुलीचें वर्तन एकसारखें हंसतें खेळतें असे. पण मनोहरला कंटाळवाणा एकटेपणा सहन न झाल्यानें कितीही वेळ त्या मुलीशी गप्पा मारण्यात गेला तरी त्याला त्याचा कंटाळा येत नसे. ती मुलगीही त्याला प्रत्येक बाबतींत उत्तेजन देई. ती वर्तनानें निर्दोष नसेल असा संशयही त्याला कधीं आला नाहीं. कारण, त्याचें वर्तन व मन सदाच निर्मळ असे.

असे काहीं दिवस गेले. त्याची आणि त्या तरुणीची मैत्री दिवसेंदिवस वाढत गेली. त्याला पगार चांगला मिळूं लागला होता; व घरांत तो एकटा आहे हें त्या मुलीला कळले, तेव्हां त्याचे पैसे लुबाडण्याची इच्छा त्या मुलीला झाली. तिने प्रेमाचा देखावा करून त्याला पूर्णपणे वश करून घेतलें, व एके दिवशीं त्याच्यापाशीं लग्न करण्याची इच्छा हळूच दर्शविली.

"यालाही एकटें आयुष्य अगदीं असह्य झालें होतें; व लग्नाची आवश्यकता भासूं लागली होती. त्या तरुणीशीं लग्न करावें असेंही त्याला सतत परिचयामुळें दिवसेंदिवस वाटूं लागलें होतें. पण त्याला संकोच वाटत होता कीं तिच्यापाशीं आपण लग्नाची गोष्ट कशी काढावी ? ती त्याची चिंता त्या मुलीनें आपणच लग्नाचा विषय काढल्यामुळें आपोआपच दूर झाली, व लौकरच त्या मुलीच्या बापाच्या संमतीनें त्या दोघांचें लग्नही झालें.

" ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो, ती मुलगी वर्तनानें अत्यंत बिघडलेली होती, हें निराळें सांगावयाला नकोच. माझ्या पक्षकाराच्या कचेरींतील अनेकांशीं तिचा अनैतिक संबंध पूर्वीपासून होताच; व तो लग्नानंतरही तसाच कायम राहिला. हें सिद्ध करण्याला मजपाशीं त्या लोकांचीं त्या तरुणीला आलेलीं अनेक पत्रें आहेत; तीं पाहून आपली खात्री होईल. ह्या गोष्टीचा सर्व बोभाटा झाला तरी माझ्या पक्षकाराला मात्र त्याची दादही नव्हती. त्याचा त्याच्या पत्नीवर पूर्ण विश्वास होता; आणि दुर्वर्तनी पत्नीच्या वर्तनाविषयींच्या कागाळ्या पतीच्या कानावर जाणें तितकेंसें शक्यही नसतें.

"त्या तरुणीचें दुर्वर्तन वाढतां वाढतां अखेर माझा पक्षकार ज्याच्यापाशीं नोकरीला होता त्याच्या एकुलत्या एका तरुण मुलाशीं तिची ओळख झाली, व तो तिच्या प्रेमपाशांत सापडला. तो मुलगा त्यावेळीं वयानें अवघा एकुणीस वर्षांचा होता. अर्थात् तो त्या स्त्रीपेक्षा दोन तीन वर्षांनीं लहान होता. त्याला तिच्याखेरीज दुसरें तिसरें कांहींच सुचेनासें झालें. इतक्या थराला गोष्टी गेल्यावर मात्र तो प्रकार माझ्या पक्षकाराच्या धन्याच्या ध्यानीं आल्याखेरीज राहिला नाहीं. त्याला त्या दोघाचाही साहजिकच संताप आला.

"त्यानें लगेच आपल्या मुलाची एकांतांत भेट घेतली, व त्याची वडीलपणाच्या नात्याने सौम्य शब्दात कानउघाडणी केली. ती स्त्री माझ्या पक्षकाराची पत्नी, एवढाच काय तो माझ्या पक्षकाराचा अन्याय !

" आणि त्याच्या पुढचा सारा प्रकार ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो, मयत धन्याच्या मृत्युशय्येवरील कबुलीजबाबात आला असल्यानें आतां फक्त तो जबाब वाचून दाखविला कीं माझें काम झालें.

" तो जबाब आपण ऐका:

'...माझ्या मुलानें माझ्या तिजोरींतून रोख दोन हजार रुपये चोरून त्या बाईला नेऊन दिल्याचें मला कळलें तेव्हां मला मनस्वी संताप आला. अर्थात् तेव्हांही मनोहराच्या प्रामाणिकपणाविषयीं व वर्तनाविषयीं मला जरादेखील संशय आला नाहीं. परंतु डोळस माणसाचा अशा प्रकारचा आंधळेपणा हा कधीं कधीं प्रत्यक्ष हातून घडणाऱ्या अपराधापेक्षांही भयंकर असतो. मीं मनोहराला बोलावून घेतलें, व त्याला नोकरीवरून दूर केल्याचें सांगितलें. मनोहर तसाच स्तब्धपणें माझ्यासमोर उभा राहिला. त्याला काय बोलावें.... अगर काय करावें हें कांहींच सुचेनासें झालें. अंमळशानें त्यानें माझ्यापाशीं खुलासा मागितला...तो खुलासा खासगी स्वरूपाचा असल्यानें देतां येत नाहीं असें मीं त्याला सांगितलें. त्यावरून मनोहराची कल्पना झाली कीं मी त्याच्या वर्तनाबद्दल संशय घेतों आहें. पुन्हा त्यानें मला परोपरीनें विनवून कारणें विचारलीं. अंमळशानें तेच प्रश्न त्यानें रागाच्या भरांत जरा ताठ भाषेंत मला विचारण्यालाही कमी केलें नाहीं. मी कांहींच खुलासा करीत नाहीं असें पाहून त्याचा राग त्याला अनावर झाला....तो मला रागाच्या भरांत कांहीं दुरुत्तरेंही बोलूं लागला...आतां आपण न बोलावें तर प्रकरण हातघाईवर येणार अशीं लक्षणें दिसूं लागलीं; व माझा रागही अनावर झाला...त्या भरांत मीं खरा प्रकार त्याला सांगून टाकला. तो माझ्या तोंडचे शब्द ऐकून कांहीं क्षण अगदीं मस्तक सुन्न झाल्यासारखा माझ्यासमोर स्तब्ध उभा होता. त्यानंतर त्यानें माझ्या टेबलाच्या खणांतून एक मोठी कात्री—जी मीं नेहमीं मोठमोठ्या पुस्तकांचीं वाढतीं पानें कापण्यासाठीं आणून ठेविली होती, ती काढून घेतली. दुसऱ्याच क्षणाला तो माझ्यावर धांवून आल्याचें व त्यानें हात आवेशानें वर आकाशांत उचलल्याचें मीं पाहिलें, तेव्हांच माझ्या छातीच्या अंमळ वर माझ्या गळ्यांत एकदम कांहीं तरी घुसल्याचा भास मला झाला...'

"ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो, ह्या खुनाच्या खटल्याचा सारा वृत्तांत हा असा आहे. ह्या सर्व गोष्टी आपणांसमोर आहेतच, व आरोपीच्या वतीनें मला अधिक कांहीं सांगावयाचें उरलेलें नाहीं. ह्या एकंदर पुराव्यावरून सद्गृहस्थ हो, आपणां सर्वांच्या ध्यानीं आलें असेल कीं आरोपीचा त्याच्या

दुसऱ्या पत्नीवर—तिच्या पातिव्रत्यावर अढळ विश्वास होता. कारण त्याची पहिली पत्नी खरोखरच पतिव्रता होती. त्या पहिल्या पत्नीवर त्याचा विश्वास व तिच्याविषयीं अलोट आदर त्याच्या मनांत वसत होता. तो सकारण होता; व द्वितीय पत्नीच्या बाबतींत तो तिला प्रथम पत्नीप्रमाणेंच आदरणीय मानून वागत असतांना तिची बदनामी करणारे शब्द धन्याच्या तोंडून ऐकतांच त्याला इतका अनावर संताप आला; त्याचाच हा परिणाम."

नंतर कचेरीच्या मामुली पद्धती प्रमाणें सरकारी वकिलाचें भाषण व न्यायाधिशाचा समारोप वगैरे सर्व शिष्टाचार पार पडल्यावर ज्यूरींतील सद्‌गृहस्थ विचार करण्यासाठीं म्हणून आंत स्वस्थानीं गेले. थोडया वेळानें ते सर्व बाहेर आल्यावर न्यायाधिशानें प्रश्न करतांच ज्यूरीच्या फोरमननें आरोपी एकमतानें निर्दोषी असल्याचें जाहीर केलें; आणि न्यायाधिशानेंही तो निर्णय मान्य केला.*

* मोपासाँच्या एका गोष्टीवरून.

# राक्षसीण ?

मी एकदां माझ्या मित्राच्या गांवीं हवापालट करण्यासाठीं गेलों होतों. तेथली आजूबाजूचीं सर्व प्रेक्षणीय स्थळें मीं पाहिलीं व दुसऱ्या दिवशीं पुन्हा माझ्या गांवीं जाण्याचें ठरविलें.

" कां इतक्या लवकर कां जातोस ? " माझ्या मित्रानें मला विचारलें.

" इथें आजूबाजूला पाहण्यासारखें होतें तेवढें पाहून झालें, आतां राहून काय करूं ? " मीं उलट विचारलें.

" सर्व पाहून झालें म्हणतोस ? नाहीं, अजून एक प्रेक्षणीय वस्तू तुला पाहावयाची आहे. आमच्या शेजारच्या खेड्यांत एक राक्षसांची आई आहे तिला तूं पाहिलेंस का ? "

मीं कुतूहलानें विचारलें, " ही राक्षसांची आई कोण बुवा ! "

तो उत्तरला, " ती एक फार भयंकर स्त्री आहे. ती शुद्ध राक्षसीणच आहे म्हणेनास ! ती दरसाल मुद्दाम एकेक राक्षसासारख्या भयंकर कुरूप मुलाला जन्म देते, आणि ते पोटचे विद्रूप गोळे डोंबारी किंवा सर्कसवाले यांना विकून पैसा मिळविते. असल्या कुरूप मुलांवर पैसा मिळविण्याचा धंदा करणारे लोक, असें एखादें चमत्कारिक मूल त्या बाईनें जन्माला घातलें आहे कीं काय याचा शोध करण्यासाठीं वारंवार येतात. आणि त्यांच्या मनाजोगें मूल आढळलें तर ते भरपूर किंमत देऊन विकत नेतात. आतांपर्यंत अशा आठ राक्षसांना त्या बाईनें जन्म दिला असून त्यांच्या जिवावर पुष्कळ मायाही जवळ केली आहे. "

माझ्या चर्येवरून मला तें कांहीं पटत नाहीं असें ओळखून पुन्हा माझा मित्र मला म्हणाला, " तुला वाटत असेल कीं मी हें कांहींतरी थट्टेवारी

बोलतों आहें, तर तसें कांहीं नाहीं. मी सांगतों तें अक्षरशः खरें आहे. इतकें कशाला ? चल तूं माझ्याबरोबर; मी तुला ती राक्षसांची गिरणी दाखवितों.” असें म्हणून माझा मित्र त्याच क्षणीं मला बरोबर घेऊन बाहेर निघाला.

ती बाई तेथून दोन मैलांवरच्या एका खेड्यांत एका लहान टुमदारशा बंगल्यांत रहात असे. त्या घरांतील टापटीप मोठी वाखाणण्याजोगी होती. घरासभोंवार सुंदर बाग केलेली असून त्या बागेंतील सुगंधी फुलांचा घमघमाट आम्ही तेथें गेलों तेव्हां सर्वत्र दरवळत होता. तें एखाद्या व्यवसायनिवृत्त वकील बॅरिस्टरचें घर असेल असेंच कोणींही म्हटलें असतें. आम्ही तेथें जातांच एका गड्यानें आम्हांला आंतल्या दिवाणखान्यांत नेऊन बसविलें. थोड्याच वेळांत ती अभागी बाई बाहेर आली.

ती बाई उंच, रेखीव चेहेऱ्याची परंतु मजबूत हाडापेराची अशी दिसली. वयानें ती तिशीच्या सुमाराची असावी. ती रूपानें तर सुंदर होतीच पण तिचा पेहराव व तिची राहाणी यांतही बरीच मोहकता होती. तिनें आम्हांला पाहतांच नाखुषीनें आमचें जें औपचारिक स्वागत केलें त्यावरून मीं अंदाज केला कीं, ही बाई समाजाला अगदीं विटलेली असावी. आपणाविषयीं समाजांत तीव्र तिरस्कार वसत आहे याची जिला जाणीव असावी.

“ आपण इकडे कोणत्या कामासाठीं आलां आहां बरें ? ” त्या बाईनें विचारलें.

माझा मित्र उत्तरला, “ आम्हीं असें ऐकलें आहे कीं, तुझें सर्वांत लहान मूल तुझ्या पूर्वींच्या राक्षसरूपी मुलांप्रमाणें नसून सामान्य माणसाच्या मुलासारखें आहे. हें खरें का ? ”

ती बाई एकदम कसली तरी शिसारी आल्यासारखी रागीट मुद्रा करून म्हणाली, “ छे, छे. मुळींच नाहीं. उलट माझें सर्वांत लहान मूल पूर्वींच्या सर्व मुलांहून जास्त कुरूप आहे. चांगलें मूल माझ्या नशिबींच देवानें लिहिलें नाहीं. जेवढीं म्हणून मुलें होतात तेवढीं एकापेक्षां एक विद्रूप. देवाचा ह्या अनाथ गरीब स्त्रीवरच इतका कोप कां न कळे. ”

बोलतां बोलतां त्या बाईची दृष्टि जखमी झालेल्या रानजनावराप्रमाणें खालीं वळलेली होती. तथापि, तो रागटीपणा व क्रूरपणा तिच्या शब्दांत

आम्हांला कोठेंच दिसला नाहीं. त्यावरून ती बाई बरीच कोमल अंतःकरणाची असावी असें मला वाटलें.

" तुझें तें मूल आम्हांला एकदां पाहूं दे तरी ! " माझा मित्र म्हणाला.

ती बाई कांहीं क्षण ओशाळल्यासारखी स्वतःशींच विचार करीत उभी होती. ती अंमळशानें पूर्वीपेक्षां जरा जोरानें उद्गारली, " तुम्हांला तें पाहून काय फायदा होणार आहे बरें ? " ते शब्द बोलतांना त्या बाईची चर्या बरीच उग्र दिसत होती.

" पण आम्हांला तें मूल दाखवायला तुझें काय जातें ? " माझा मित्र म्हणाला, " तूं इतर पुष्कळांना आपलीं मुलें दाखवितेस. मी कोणत्या लोकांविषयीं बोलतों आहें हें तुझ्या ध्यानीं आलें असेलच. "

ती बाई जास्तच संतापून चढत्या स्वरांत म्हणाली, " एकूण तुम्ही त्या हेतूनें माझ्याकडे आलां आहां तर ? मी जनावर आहें अशी तुमची कल्पना असल्यामुळें तुम्ही माझा असा अपमान करतां काय ? नाहीं—नाहीं ! माझें मूल मी तुम्हांला कधींही दाखविणार नाहीं. तुम्ही येथून चालते व्हा. तुम्ही लोक काय किंमतीचे आहां हें मला पक्कें माहीत आहे. "

त्या बाईचा तो चंडिकेचा अवतार पाहून मी झट्कन भीतीनें मागें सरलों. माझा मित्रही माझ्या मागोमाग पाठमोरा येतां येतां त्या बाईला जरा ताठपणानें म्हणाला, " ए राक्षसणी, याद राखून ठेव, एका दिवशीं तूं अशानें गोत्यांत येशील. "

ती बाई खवळलेल्या वाघिणीसारखी संतापानें नखशिखान्त थरथर कांपत उद्गारली, " अरे राक्षसांनो, मुकाट्यानें इथून चालते व्हा. मी आणखी कसल्या गोत्यांत येणार आहें ? जा, तुम्ही येथून काळें करा अगोदर. "

तेव्हां जर आम्ही सावधपणानें पळालों नसतों, तर त्या बाईनें खास आमच्या नरडीचा घोंट घेतला असता, इतकी ती त्या वेळीं संतापली होती.

तेथून आम्ही रस्त्यावर आल्यावर माझा मित्र मला म्हणाला, " तुला त्या बाईविषयीं काय वाटतें ? आतां तूं तिला पाहिलेंच आहेस. आतां तुझा काय तर्क आहे तो सांग. "

मी म्हणालों, " मला तिची सारी हकीकत सांग तर खरी ! "

आम्ही वाटेनें चाललों असतां माझ्या त्या मित्रानें मला त्या बाईची पुढीलप्रमाणें हकीकत सांगितली.

" ही बाई अगदीं लहान म्हणजे चवदा पंधरा वर्षांची असल्यापासून एका श्रीमान सरदाराच्या घरीं मुलें संभाळण्याच्या कामावर होती. ती अत्यंत आज्ञाधारक सेवक असून तिचें वर्तनही अगदीं शुद्ध होतें. तिला एखादा प्रियकर असल्याचें अथवा तशा प्रकारची तिची मनःप्रवृत्ति असल्याचें कोणालाही माहीत नव्हतें. मात्र एक नैसर्गिक दोष तिच्या अंगीं होता.—ती दिसायला सुंदर होती ! गरिबांच्या स्त्रियांनीं सुंदर असणें हा एका परीनें त्यांचा दोषच होय. एके दिवशीं सरदारपत्नी आपल्या एका मैत्रिणीच्या लग्नाला गेली असतांना सरदार एकटेच घरांत होते. तेव्हां त्यांच्या मनांत त्या तरुण मुलीविषयीं येऊं नये तो विचार आला; आणि ती तरुणीही सत्ता व श्रीमंती यांच्या मोहाला व बळजबरीला बळी पडली.

"कांहीं दिवसांनीं आपणाला कांहीं दिवस गेले आहेत हें त्या तरुणीच्या ध्यानीं आलें, आणि लज्जा व भय ह्या दुहेरी मारानें तिचें अंतःकरण अगदीं चक्काचूर होऊन केलें. कोणीकडून तरी आपल्या पापावर पांघरूण पडावें म्हणून ती तरुणी लांकडाच्या चिपा आणि बळकट दोरी यांच्या साह्यानें आपलें पोट अगदीं घट्ट बांधून टाकूं लागली. महिन्यामागून महिन्यानें तिच्या उदरांतील गर्भ जसा वाढूं लागला, तसतशी ती आपलें पोट जास्त जास्त आवळून बांधूं लागली. त्यामुळें तिला प्राणांतिक वेदना होत असत. पण हें सारें ती आपल्या पापावर पांघरूण घालण्यासाठीं करीत असल्यामुळें कोणालाही आपला संशय येऊं नये म्हणून ती अगदीं हंसून खेळून वागे.

" त्यामुळें तिचें गर्भवासी बालक इतकें विद्रूप झालें कीं, त्याला मनुष्यप्राणी म्हणण्याचीही पंचाईत पडली असती. त्या बालकांच्या कपाळाची कवटी अगदीं सपाट झाली होती. त्याचे डोळे डोक्यांतून जणूं काय बाहेर ओढून काढले होते. सर्व शरीर पिळून काढलेल्या उसाच्या चिपाडासारखें दिसत होतें, आणि हातांपायांची अवस्था तर कोळ्याच्या पायांसारखी झाली होती. त्या बालकाकडे एकदम कोणी पाहातांच तो एक हाडामासांचा जिवंत गोळा आहे असें वाटे.

" ती तरुणी गरोदर असतांनाच सरदारीणबाईच्या हट्टामुळें सरदारांनीं तिला घरांतून हाकलून लावलें. तेथून ती गांवांतील एका ओळखीच्या म्हाताऱ्या बाईपाशीं गेली आणि तिथेंच तिचें तें पहिलें मूल जन्माला आलें. तेव्हां अमक्या तमक्या बाईच्या पोटीं राक्षस जन्माला आला आहे असा सर्वत्र बोभाटा झाला.

" बाळंपतणांतून उठल्यानंतर त्या तरुणीला पोटाची खळगी भरण्यासाठीं भिक्षा मागणें प्राप्त झालें. तेव्हां ती मधून मधून विलासी पुरुषांच्या हांकेलाही ओ देत असे. परस्त्रीशीं संबंध ठेवणें म्हणजे नरकाचें साधन करणें होय हें नीतितत्त्व माहीत सर्वांनाच असतें; पण म्हणून त्या नरकाला कुणी भितो थोडाच !

" त्या बाईनें आपल्या बालकाची जोपासना तर करावी; पण मनांतून मात्र बेअब्रू आणि असल्या विद्रूप मुलाचें मातृपद वांट्याला आल्यानें झुरत असावें. त्या विपयाच्या भरांत कधीं कधीं तर तिच्या मनांत असेंही येई कीं त्या पोराला एकदाचें ठार मारून टाकावें. पण बालहत्येबद्दल शिक्षा करणाऱ्या कठोर फौजदारी कायद्याची तरवार तिच्या मानेवर सदोदित लटकत असल्यामुळें तिचा नाइलाज होता. शिवाय तें मातृहृदय !

कांहीं दिवसांनंतर शेजारच्या तालुक्याच्या मोठ्या गांवीं एक ब्रह्मी सर्कस आली. अमक्या तमक्या खेड्यांत एका बाईच्या पोटीं मनुष्यप्राण्याहून भिन्न दिसणारें विचित्र मूल जन्माला आलें आहे, ही बातमी ऐकून त्या सर्कशीचा म्यानेजर त्या बाईकडे गेला. त्या म्यानेजरनें तें मूल पाहिलें व त्याला तें सर्कशीच्या उपयोगाचें वाटलें. त्यानें ताबडतोब त्या बाईला पांचशें रुपये देऊन तें मूल विकत घेतलें.

" त्या बाईला प्रथम हायसें वाटलें. झालें तें झालें, आतां यापुढें तरी असला प्रसंग आपणावर येऊं नये असें ती पहिल्यापहिल्यांदा म्हणे. परंतु ऐहिक सुखाचा मोह कोणाला थोडाच चुकला आहे ? तिनें पाहिलें कीं संपत्ति हें सर्व सुखांचें साधन होय, व असलीं विद्रूप मुलें ही संपत्ति मिळविण्याचें साधन होय.

" तेव्हांपासून ती बाई संपत्तिसाधनाचा तो उद्योग म्हणून करूं लागली. पुरवठ्यापेक्षां मागणी जास्त असली कीं मालाची किंमत वाढते हें अर्थशास्त्राचें

साधें तत्व तिला प्रत्यक्ष अनुभवानें माहीत झालें होतें. अशीं विद्रूप मुलें वारंवार जन्माला येत नसतात; व म्हणूनच अधिकउणा पैसा देऊनदेखील सर्कसवाल्यांसारखे धंदेवाईक लोक तीं विकत घ्यावयाला झटतात, हें तिला माहीत होतांच ती अशा मुलाविषयीं लोकांशीं रुपया दोन रुपयांपासून घासाघीस करू सौदे ठरवूं लागली. लोकांनीं आपल्याला ऐनवेळीं फसवूं नये म्हणून तिनें अशा लोकांशीं आगावू करार करून पैसेही घ्यावेत. जणूं काय ती बाई ठराविक मालाची मक्तेदारीण बनली होती !

" अनपेक्षित रीतीनें पैसा मिळूं लागतांच त्या बाईची दृष्टी पालटली. विद्रूप मूल पोटीं जन्माला आल्याचा पहिल्यांदां जो तिरस्कार तिला वाटत होता तो आतां वाटेनासा झाला. उलट दरसाल असें एकतरी मूल आपल्या उदरीं जन्माला यावें व सरदार जहागीरदारांप्रमाणें आपलें हें एक कायमचें वर्षासन होऊन बसावें असा अनावर लोभ तिला सुटला.

" त्या बाईची ती महत्वाकांक्षा तिच्या कल्पनेबाहेर पूर्ण झाली. हुकुमाच्या पत्त्याप्रमाणें दरसाल तिला मूल होऊं लागलें. गरोदरपणांत आपण कसें वागलें म्हणजे मुलें इतकीं विद्रुप निपजतात हें तिला आतां पूर्ण माहीत झालें होतें. त्या कलेंत तिचा हात धरण्याला कोणीही समर्थ नव्हतें.

" वेड्या वांकड्या व विद्रूप चेहऱ्याचीं राक्षसासारखीं भयंकर दिसणारीं, पण त्या विद्रूपतेंतही परी आहेत अशीं कितीतरी मुलें त्या बाईच्या पोटीं क्रमाक्रमानें जन्माला आलीं. त्यांतलीं थोडीं अकालीं मेलीं, तों आपला तोटा झाल्याबद्दल बाईला वाईट वाटणारच.

" दरम्यान ह्या गोष्टीचा बभ्रा होऊन कांहीं शिष्टांनीं त्या बाईवर कायदेशीर बंधन घालण्याचा प्रयत्न केला. पण अशा गोष्टी थांबविण्याची तरतूद कायद्यांत कोठेंच केली नसल्यामुळें तेथें कोणाचेंच कांहीं चालेना, व त्या बाईचा उद्योग निर्वेध चालूं लागला.

" आजवर त्या बाईचीं एकूण आठ मुलें निरनिराळ्या ठिकाणीं जिवंत आहेत. इतक्या मुलांची किंमत तिला आजवर आठदहा हजार रुपये तरी सहज मिळाली असेल. त्या पैशांतूनच स्वतःचें टुमदार घर तिनें बांधलें आहे व तेथें ती चैनींत रहात आहे. हें शेवटचें नववें मूल मात्र ती अजून कोणाला दाखवीत नाहीं. परंतु तें देखील ती आज ना उद्यां विक्रीला काढल्याखेरीज

राहाणार नाहीं. तिची ही कीर्ति आतां देशोदेशीं पसरली आहे. त्यामुळें दूरदूरचे सर्कसवाले मधून मधून आपणाला उपयुक्त अशी एखादी सजीव वस्तू तिनें जन्माला घातली आहे कीं काय हें पहाण्यासाठीं येत असतात. एखादें मूल विशेष विद्रूप व मजेदार आहे असें त्या बाईला आढळलें तर ती त्याचा लिलांव मांडून शक्य तितकी जास्त रक्कम वसूल करते."

एवढें सांगून माझा मित्र स्तब्ध राहिला. ती गोष्ट ऐकून मला तेव्हां इतकी शिसारी आली कीं त्या क्षणीं ती पशुवृत्तीची बाई जर माझ्या हातीं सांपडली असती तर मीं तिची नरडी दाबून तिचा जीव घेतला असता.

"पण ह्या सर्व मुलांचा जन्मदाता कोण असावा ?" मीं विचारलें.

"ते कुणालाच माहीत नाहीं." माझा मित्र उत्तरला, "ती बाई आणि ते पुरुष असल्या गोष्टी जाहीर करण्याला लाजत असतील. कदाचित् ह्या किफायतशीर धंद्यांत त्या बाईशीं कित्येकांची भागीदारीही असेल !"

× × ×

त्याच दिवशीं सायंकाळीं माझा तो मित्र आणि मी समुद्रकिनाऱ्यावर फिरावयाला गेलों असतांना एक तरुण व सुंदर स्त्री मोहक वस्त्राभरणांनीं नटूनथटून तेथें फिरावयास आलेली मला दिसली. तिच्याबरोबर बरेच ऐटबाज तरुणही होते.

आम्ही दोघे समुद्रकांठच्या रेतींतून फिरत फिरत वीस पंचवीस पावलें दूर जातों तों मध्यम वयाची एक दाई तिघां अगदीं कृश व कुरूप मुलांना सांभाळीत असलेली दिसली. त्या मुलांपैकीं एकाला कान अजिबात नव्हते, आणि पायही अगदीं पांगळे होते. असाच कांहीं ना कांहीं भयाण विद्रूपपणा इतर दोन मुलांतही होता.

माझा मित्र त्या मुलांकडे बोट दाखवून मला म्हणाला, "आतां आपण ती सुंदर तरुणी पाहिली ना ? तिचींच हीं मुलें."

मला तें ऐकून हळहळ वाटली. मीं म्हटलें, "गरीब बिचारी. इतक्या दुःखांतही ती आनंदानें हंसून खेळून आयुष्य कसें काढते हेंच कळत नाहीं."

"तिच्याविषयीं तुला इतकी हळहळ कशाला वाटते ? बिचाऱ्या त्या मुलांची मात्र कींव करावी तेवढी थोडी आहे. त्या बाईला स्वतःचें तारुण्य

व सौंदर्य सदैव ताज्या फुलांप्रमाणें ताजें असावें असें वाटतें व म्हणून ती जे जे चाळे करते त्यांचें हें फळ होय. असले उपाय केव्हां तरी आपल्या जिवावर बेतण्याचा संभव आहे हें तिला कळतें. पण अशानें तिचें सौंदर्य व तारुण्य जोंवर सदाफुलीप्रमाणें ताजें राहातें आहे, तोंवर बाकीचे विचार तिला सुचतात तरी कशाला ! ”

तेव्हां मला सकाळच्या त्या राक्षसांच्या आईची आठवण झाली. ती आपलीं मुलें विद्रूप करून विकून पोटासाठीं व सुखासाठीं पैसा मिळवीत असे, आणि ती श्रीमंत बाई पैशाची गरजू नसूनही विषयसुखाची गरजू असल्यानें आपलीं विद्रूप मुलें मेलीं कीं जितीं याचीही पर्वा करीत नसे, इतकाच काय तो त्या दोन्ही स्त्रियांत फरक ! पण ती पहिली स्त्री बिचारी गरीब पडली, म्हणून ती राक्षसीण ठरली; व ही दुसरी बाई सभ्य श्रीमंतांच्या घोळक्यांत वावरते म्हणून तिची समाजांत एवढी प्रतिष्ठा.!

मीं मनांत म्हटलें “ जग हें असें आहे !”*

* मोपासाँच्या एका गोष्टीवरून.

# कोंबडा आरवला !

त्या दिवसापर्यंत भानुमतीनें सर्व प्रकारचे मोह टाळले होते. विक्रांत हा इतक्या प्रेमळपणानें तिच्याशीं वागे कीं कोणाही सहृदय स्त्रीला त्या प्रेमळपणाचा अनादर करणें शक्य नव्हतें. तरीही विक्रांतानें आशा सोडली नव्हती. सणासुदीच्या वेळीं सुंदर सुंदर वस्तू त्यानें मुद्दाम भानुमतीला नेऊन द्याव्या; त्याप्रमाणेंच तिला अनेकदां आपल्याबरोबर मृगयेलाही न्यावें. भानुमतीला मृगयेचा फार शोक होता; आणि तिला घरांतही पुष्कळच स्वातंत्र्य होतें.

तथापि, भानुमतीचा पति गोपीनाथ याला आपल्या पत्नीचा विक्रांताशीं परिचय असल्याचें मात्र माहीत नव्हतें. लोकांत असा प्रवाद होता कीं, गोपीनाथ हा नेहमीं शारिरिक दुबळेपणामुळें भानुमतीपासून दूर राहातो. भानुमतीसारख्या विवाहित स्त्रीला अर्थात् हें कसें आवडणार ? गोपीनाथ हा दुऱ्या हाडाचा पण ठेंगू असा गृहस्थ होता. बुटकेपणा हा त्याचा विशेष होता. याच्या उलट भानुमती ही उंच, एकशिवडी व पाणीदार आणि मोहक चर्येची स्त्री होती. तितकीच ती मनमोकळी व तोंडाची कांहींशी फटकळही होती. अनेकदां ती गोपीनाथाच्या हातून कांहीं चूक झाल्यास अगर कांहीं चूक न होतांदेखील त्याच्या तोंडावर उपहासानें हंसावयाला कमी करीत नसे. कांहीं कांहीं वेळां तर विक्रांतासमोरही अशा गोष्टी घडत, त्या वेळीं भानुमतीच्या एकाच चर्येवर गोपीनाथाला तिरस्काराच्या व विक्रांताला कुतुहलाच्या छटा उमटलेल्या दिसत. यावर गोपीनाथ 'बाईसाहेब काय म्हणतील तें खरें' असें म्हणून वेळ निभावून नेत असे. विक्रांत आणि भानुमती तेव्हां एकमेकांकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत असत.

हें करूनही भानुमतीनें विक्रांताची मनीषा पूर्ण होऊं दिली नव्हती. विक्रांत तिच्यासाठीं एकसारखा तळमळत होता. तो एक खानदानी सरदार असल्यामुळें संपत्तीला त्याला कांहीं तोटा नव्हता. पण त्या संपत्तींतला जेवढा भाग भानुमतीच्या आदरसत्कारांत खर्च होईल तेवढाच सत्कार्यीं लागला असें त्याला वाटे. विक्रांताचा एक बंगला त्याच्या मालकीच्या शिकारीच्या जंगलाशेजारीं मुद्दाम बांधलेला होता. तेथें सर्व प्रकारच्या सुखसाधनांची अनुकूलता होती. भानुमती अनेकदां शिकारीला गेली म्हणजे त्या बंगल्यांतच वास्तव्य करी.

ते दिवस पावसाळ्याचे होते. वृक्षांचीं पिकलीं पानें पांखरांच्या थव्यांनीं भुर्रकन शेतांत येऊन बसावें त्याप्रमाणें वाऱ्याच्या झोताबरोबर गळून पडत होतीं. तो पानपाचोळा दमट हवेंत बंगल्यासभोंवार अर्धवट कुजल्यामुळें त्यांचा चमत्कारिक वास मधून मधून सुटत असे. शारिरिक श्रमानें श्रांत झालेल्या प्रियतमेला तिच्या प्रियकरानें बाहुपाशांत कवटाळल्यावर तिच्या सर्वांगाचा चमत्कारिक वास असाच येत असतो असें त्या वेळीं विक्रांताला वाटे.

× × ×

त्याच वर्षीच्या वसंत ऋतूंत एके दिवशीं भानुमती मृगयेच्या निमित्तानें विक्रांताबरोबर त्या बंगल्यांत आली असतांना त्याच्या उद्विग्न चित्ताला प्रसन्न करण्यासाठीं म्हणाली होती, "विक्रांत, तुमच्या प्रेमाच्या हांकेला ओ देण्याची बुद्धि परमेश्वर मला देईल असें वाटतें. आणि तसा योगायोग जर असला तर तो सोन्याचा दिवस आज झाडावर उगवणारी कोंवळी पालवी पिकून गळून पडण्यापूर्वींच उगवेल!"

भानुमतीचे वरील उद्गार विक्रांत कसा विसरेल? त्यानें वृक्षाचीं पिकलेलीं पानें गळून पडतांना पाहिलीं तेव्हां त्याला त्या उद्गारांची आठवण झाली. आणि भानुमती दिवसेंदिवस अधिकाधिक प्रेमळपणानें वागतांना पाहून विक्रांताला अधिकाधिक आशा वाटूं लागली होती कीं, भानुमती आतां अंतःकरणानें तरी आपणाला वश झाल्यासारखीच आहे. आतां विलंब फक्त मन आणि शरीर यांमधील अवघड अंतर तोडण्याचा आहे.

तशाच एके दिवशीं विक्रांत आणि भानुमती यांनीं त्या जंगलांत

डुकरांची शिकार करण्याचें ठरविलें. नुकतेच एक दोन डुक्कर त्या जंगलांत पिसाळल्याचा बोभाटा विक्रांताच्या कानीं आला होता.

भानुमती विक्रांताला म्हणाली, " विक्रांत, ह्या पिसाळलेल्या जनावराला जर तुम्ही ठार मारलेंत, तर मी तुम्हांला एक अमोल देणगी देईन."

× × ×

दुसऱ्याच दिवशीं पहांटेला विक्रांत त्या पिसाळलेल्या डुकराची शिकार करायला निघाला. रान उठविणारीं माणसें व इतर साहित्यही भरपूर बरोबर घेऊन त्यानें सशाच्या शिकारीसाठीं वाघाच्या शिकारीची तयारी करावी इतकी खबरदारी घेतली होती. आज कांहीं झालें तरी ही शिकार करावयाचीच व भानुमतीला ती खंडणी देऊन वश करावयाचेंच, असा त्यानें निर्धार केला होता.

शिकारीचा इषारा मिळाला. लोक रान उठवूं लागले. विक्रांत सर्व साधनसामुग्रीनिशीं सज्ज झाला. शिकारी कुत्रे शिकारीच्या वासावर इकडे तिकडे दौडूं लागले. विक्रांताचा घोडाही तितक्याच आवेशानें व उत्साहानें पण अत्यंत आज्ञाधारकपणानें दौडूं लागला. त्याच्यामागून गाडी, घोडेस्वार, वगैरे लवाजमा चालला होता.

त्या दिवशीं भानुमतीनें मनांत काय योजिलें होतें कळे; पण तिनें विक्रांताला अगदीं आपल्याबरोबर ठेविलें होतें. ती त्याच्याबरोबर एकसारख्या गोष्टी बोलत होती. आपल्या नादांत गुरफुटून जाऊन विक्रांतानें शिकार चुकवावी असा तर तिचा मानस नसेल ना ? एकीकडे भानुमतीच्या गोड गोड प्रश्नांना उत्तरें द्यावयाचीं व त्याच वेळीं दुसरीकडून रान उठविणाऱ्या लोकांच्या ललकारण्या आणि शिकारी कुत्र्यांचें भुंकणें ऐकून त्या धोरणानें शिकारीवर पाळत ठेवावयाची, ह्या दोन गोष्टी विक्रांताला एकाच वेळीं कराव्या लागत होत्या. तरीपण लोक ललकारत व शिकारी कुत्रे भुंकत पुढें चालले होते, व विक्रांत भानुमतीच्या मोहपाशांत गुरफुटून गेल्यामुळें मागें मागें रेंगाळत होता.

विक्रांत शिकारीचा पाठलाग करण्यासाठीं इतका उतावीळ झालेला

पाहून भानुमतीनें त्याला विचारलें, " एकूण विक्रांत ! तुमचें माझ्यावर प्रेमच नाहीं म्हणायचें तर !"

" असें कसें बरें म्हणतेस ?" विक्रांतानें विस्मयपूर्वक प्रश्न केला.

" पण तुम्हांला माझ्यापेक्षां शिकारच जास्त आवडते असें दिसतें. कारण तुमचें लक्ष माझ्यापेक्षां त्या शिकारीकडे विशेष गुंतलेलें आहे." भानुमती पुन्हा म्हणाली.

" पण भानुमती ! तूंच मला ही शिकार करण्याची आज्ञा केली नाहींस का ?"

" अर्थात् ! ती तर माझी अट आहेच." भानुमती हंसत पण चर्येवरील गंभीरपणा कायम ठेवून म्हणाली, " त्या पिसाळलेल्या डुकराला तरी तुम्हीं ठार मारलेंच पाहिजे. पण तें माझ्यादेखत ठार मारलें पाहिजे." लगेच ती आपला घोडा विक्रांताच्या घोड्याबरोबर अगदीं लगटून चालवूं लागली. मात्र ती मुद्दामच आपला घोडा शक्य तितका आवरून धरीत होती. त्यामुळें विक्रांतालाही आपला घोडा आंखडून धरणें भाग पडत होतें.

" भानुमती, असा जर मी तुझ्याबरोबर रेंगाळत राहिलों, तर शिकार करून तुझी मनीषा पुरवणें मला अगदीं अशक्य होऊन बसेल." विक्रांत बाजूला वळून भानुमतीकडे पहात म्हणाला.

"पण तें कांहीं झालें तरी तुम्हीं माझा पण पुरा केलाच पाहिजे. नाहींपेक्षां ह्या उभ्या जन्मांत मी तुमची होणार नाहीं." असें म्हणून भानुमतीनें आपला कोमल हस्त एकवार विक्रांताच्या घोड्याच्या स्कंधावर ठेवला, व आपल्या घोड्याला दोन पावलें पुढें चालवून थोपवून धरून त्याच्या घोडयाची आयाळ कुरवाळण्याला सुरवात केली. कोणाला वाटावें, केवळ नजरचुकीनें ही असें करते आहे.

हें संभाषण चाललें असतांना तीं दोघें वनराजीच्या गर्द छायेंतून घोडा फेंकीत चाललीं होतीं. वृक्षांच्या फांद्यांत फांद्या कमानींसारख्या गुंतवून निसर्गदेवतेनें तीं जणूं त्या प्रणयी जीवाच्या आदरातिथ्यासाठीं तोरणेंच उभारलीं होतीं. तोंच एक फांदी इतकी सखल लोंबकळत होती कीं तिच्या खालून जाण्यासाठीं विक्रांताला आपली मान किंचित लववावी लागली. तसेंच भानुमतीलाही करावें लागलें. त्या दोघांनींही आपलें घोडे क्षणभर

उभे केले. भानुमती अशा कांहीं खुबीनें वांकली कीं तिची फणा उभारलेल्या सर्पासारखी वेणी विक्रांताच्या बाहूवर आधारली, व तिचें सुगंधानें दरवळणाऱ्या केशकलापानें विभूषित मस्तक त्याच्या स्कंधावर टेकलें गेलें. त्याच्याच्यानेंही मग राहवेना. मधुर फळांनीं ओथंबलेल्या वनराजींतून सहल करतांना त्यांतलें एखादें फळ तोडून चाखण्याचा मोह कुणाला पडणार नाहीं ? त्यानें प्रेमभरानें आपल्या विशाल भरदार बाहूंचा तिच्या मानेला विळखा घालून प्रेमभरानें तिचें चुंबन घेतलें.

त्या पहिल्या क्षणाला भानुमति तिळभरदेखील हलली नाहीं; अगदीं एखाद्या निर्जीव पुतळीसारखी निश्चल उभी होती. मात्र कांहीं क्षणानंतर तिनें आपलें मस्तक किंचित् बाजूला वळविलें. तिनें तें मुद्दामच केलें असें नव्हे. पण तसें करतांना तिचे ओंठ त्याच्या ओंठांना चिकटले. लगेच दुसऱ्या क्षणाला तिनें आपल्या घोड्याला अशी टांच मारली कीं तो एकदम चौफेर उधळत सुटला. त्याबरोबर विक्रांतही आपल्या घोड्याला टांच मारून तसाच तिच्याबरोबर वायुवेगानें दौडत निघाला.

रान उठविणाऱ्या लोकांच्या आरोळ्या आतां जवळ जवळ ऐकूं येऊं लागल्या. त्या आरोळ्यांनीं ती सारी वनराजी कंपायमान होत होती. तेवढ्यांत गडगडाट होतां होतां वीज चमकावी त्याप्रमाणें रक्तबंबाळ झालेला एक मोठा डुक्कर चवताळून गर्जना करीत पुढें आला. शिकारी कुत्र्यांनीं त्याचे लचके तोडतोडून त्याचा जीव अगदीं हैराण करून सोडला होता. विक्रांत तो देखावा पाहून स्फुरण पावून मोठ्यानें उद्गारला, “ज्या कोणाचें माझ्यावर अंतः-करणापासून प्रेम असेल त्यांनीं माझ्या मागोमाग यावें.” आणि त्याबरोबरच त्यानें घोडा असा कांहीं वेगानें फेंकला कीं, त्या भयाण अरण्यानें जणूं कांहीं त्याला गिळूनच टाकलें.

भानुमती विक्रांताला बघीत घोडा दौडीत पुढें निघाली. ती थोडीशी पुढें जाते तों समोरच विक्रांत एका झुडुपाजवळून वर उठतांना तिला दिसला तो त्या वेळीं रक्तानें जणूं काय नखशिखान्त न्हाला होता. त्याच्या अंगावरील कपड्यांच्या फाडफाडून अगदीं चिंध्या झाल्या होत्या. त्याच्या शेजारीं झुडुपाच्या कडेला एक मोठा डुक्कर रक्तबंबाळ होऊन मरून पडला होता. विक्रांताचा तीक्ष्ण शिकारी सुरा त्या डुकराच्या पोटांत आरपार भोसकलेला दिसत होता.

विक्रांताचे शिकारी कुत्रे त्या गतप्राण जनावराच्या मांसावर ताव मारूं लागले होते.

ती रात्रींची वेळ असल्यामुळें सर्वत्र अगदीं शांत-निःस्तब्ध होतें. विक्रांत आणि भानुमती यांच्या हातांतील विजेच्या दिव्यांच्या पिवळ्या प्रकाशांत आकाशांतील उगवत्या चंद्राचें चांदणें मिसळून त्या भयाण अरण्यप्रांतालाही एक प्रकारची अपूर्व शोभा आली होती. रान उठविणाऱ्या शिकाऱ्यांच्या लल्काऱ्या दूरदूर ऐकूं येत होत्या, आणि त्यांचा प्रतिध्वनि सर्व वनप्रांतांत घुमत होता. त्या आकस्मिक हालचालीमुळें गडबडून जागे झालेले वन्य पशू, ससे वगैरे सैरावरा इकडे तिकडे धावूं लागले होते. तेवढ्यात पक्ष्यांचा एक थवा शिकारी कुत्र्यांच्या ओरडण्यानें भिऊन त्यांच्या डोक्यावरून फडफडत निघून गेला.

" विक्रांत, आतां बंगल्यांत येणार ना ? " असें म्हणून भानुमतीनें आपल्या हाताचा आधार देऊन त्याला वर उठविलें. तो कांहीं न चालण्याइतका जखमी झाला नव्हता. तथापि, सामान्य माणसाला त्या जखमा भारीच होत्या. त्या सर्व वेदना धीरोदात्त वीराप्रमाणें सहन करून विक्रांत भानुमतीच्या गळ्यांत हात घालून तिच्याबरोबर चालूं लागला. चालतां चालतां त्या दोघांनीं एकमेकांचें कितीतरी वेळा चुंबन घेतलें. आतां तीं पर्णहीन वृक्षराजीच्या फांद्यांखालून चाललीं होतीं. वरून त्यांच्यावर निसर्गदेवता शीतल चंद्रप्रकाशाचा सुधावर्षाव करीत होती. त्या आनंदाच्या उन्मादकालीं त्या दोघांचेंही प्रेम उचंबळून येऊं लागलें. तीं दोघेंही जरी अगदीं जवळजवळ होतीं, तरीही आपण एकमेकांपासून कितीतरी दूर आहों असेंच त्यांना वाटत होतें; व तीं जवळ—अगदीं जवळ—एकमेकांशीं अगदीं एकजीव होण्यासाठीं तळमळत होतीं. हां हां म्हणतां त्यांना ती तळमळ इतकी असह्य झाली कीं, दोघेंही थोडा वेळ एका वृक्षाच्या मुळाशीं एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून स्तब्ध बसलीं.

" चला, आपण एकदां बंगाल्यांत जाऊं. " असें म्हणून भानुमती उठली. तिचा हात हातीं घेऊन विक्रांतही उठला. दोघेंही हळूहळू चालत बंगल्यापाशीं जाऊन पोहोंचलीं.

" मला आज इतके श्रम झाले आहेत कीं केव्हां एकदां बिछान्यावर

जाऊन पडेन असें वाटतें." भानुमती गालांतल्या गालांत हंसत विक्रांताकडे पहात म्हणाली.

विक्रांतानें त्या रात्रीपुरतें भानुमतीचें अखेरचें चुंबन घेण्यासाठीं आतुरतेनें आपल्या हाताचा विळखा तिच्या कमरेला घातला व तोंडाजवळ तोंड नेलें, तोंच भानुमती चट्कन् स्वतःची मोकळीक करून घेऊन बाजूला होतां होतां पूर्ववत् प्रेमळ वृत्तीनें उद्गारली, " नाहीं नाहीं, ज्या कुणावर माझें अंतःकरणापासून प्रेम असेल त्यांनीं माझ्या मागोमाग यावें. "

सुमारें एका तासानंतर बंगल्यांतील सर्व मंडळी झोंपी गेली व सर्वत्र सामसूम झालें, तेव्हां विक्रांत हळूच आपल्या शय्यागृहांतून उठला व चोरट्या पावलांनीं भानुमतीच्या शय्यागृहाजवळ येऊन तिच्या दरवाजावर हळूहळू टिचक्या मारूं लागला. लगेच त्यानें दरवाजा लोटला. त्याला आंतून कडी नसल्यामुळें तो चटकन् उघडला गेला.

भानुमती आपल्या खिडकीला टेंकून एकटीच कसल्या तरी मनोराज्यांत गर्क झाली होती. तोंच विक्रांतानें तिच्या समोर जाऊन गुडघे टेकले व तिच्या गुडघ्याचें चुंबन घेतलें. ती मुखावाटे एक अक्षरही बोलली नाहीं; मात्र आपल्या नाजूक हातांनीं त्याचा केशभार कुरवाळूं लागली. जराशानें ती स्वतःच्या मनाशीं कांहींतरी निश्चय करून हळूच वर उठतां उठतां म्हणाली, " जरा थांबा, मी आतां माघारी येत्यें. मग रात्र आपलीच आहे. "

आणि जातांजातां तिनें त्या शय्यागृहांतील एका कोपऱ्यांत असलेल्या आपल्या पलंगाकडे अंगुलिनिर्देश केला.

विक्रांत त्या शय्यागृहांतील मंद पण आल्हाददायक अशा निळ्या प्रकाशांत तेथून उठला व भानुमतीच्या पलंगावर जाऊन पहुडला. पराच्या मऊ मऊ गाद्या–उशांनीं शृंगारलेली ती शय्या, श्रमामुळें दमल्याभागलेल्या त्याच्या शरिराला अत्यंत सुखावह वाटली. त्या आनंदातिशयांत तो क्षणभर आपला प्रेमविषयही विसरून गेला.

तथापि, बराच वेळ झाला तरी भानुमती कांहीं माघारी आली नाहीं. कदाचित् विक्रांताच्या सहनशीलतेची परीक्षा पहाण्यांत तिला मौज वाटत असावी. कांहीं वेळानें विक्रांताचे डोळे निद्राभारानें मिटूं लागले. तो तशा सुखासीन स्थितींतही आतुरतेनें भानुमतीची वाट पहात होता. एका बाजुनें

भानुमतीच्या सहवाससुखाविषयींच्या रम्य कल्पना आणि दुसऱ्या बाजूनें श्रमलेल्या शरिराला सुखकर शय्येवर मिळणारी विश्रांति यामुळें मनाला वाटणाऱ्या आनंदाच्या भरांत विक्रांताला केव्हां झोंप लागली हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं.

त्या रात्रौ विक्रांताला इतकी गाढ झोंप लागली कीं, दुसऱ्या दिवशीं चांगलें उजाडेपावेतों तो मुळींच जागा झाला नाहीं. परंतु तेवढ्यांत त्या शय्यागृहाची खिडकी उघडी होती त्या बाजूनें कोंबडा आरवलेला ऐकून तो जागा झाला. तेव्हां त्याच शय्येवर आपल्या अंगाला लगटून कोणी स्त्री झोंपी गेली असल्याचें त्याला कळून आलें. त्यानें तें ओळखलें व एकवार निजसुरे डोळे चोळीत सभोंवार पाहात विचारलें, "हें काय ? मी कुठें आहें ?" आपण रात्रौ प्रथम ज्या शय्येवर झोंपी गेलों ती ही नसून ही निराळीच आहे असें पाहून तो पुन्हा उद्गारला, " हीं एकंदर प्रकार आहे तरी काय ? "

भानुमती जागीच होती. रात्रभर तिचा डोळ्याळा डोळा लागला नव्हता. ती नेहमीं आपल्या नवऱ्याशीं ज्या सत्तेच्या व रागाच्या स्वरांत बोलत असे त्याच स्वरांत उद्गारली, " कांहीं नाहीं, हा कोंबडा आरवला. दुसरें कांहीं नाहीं. विक्रांत, तुम्ही पुन्हा आपले झोंपी जा कसे ! सोन्यासारखी झोंप सोडून अवांतर गोष्टीशीं तुम्हांला काय करायचें आहे ! एवढ्याचसाठीं तुम्ही इथें आलां ना ? अरसिक कुठचे ! "❀

---

( ❀ मोपासाँच्या एका गोष्टीवरून )

## कवि आणि कुत्रा

तो एक सर्वत्र प्रख्या पावलेला कवि होता. त्या प्रसिद्धीबरोबरच अनेक मोठमोठ्या विद्वान् व धनवान् लोकांशीं त्याच्या ओळखीपाळखी बऱ्याच झालेल्या होत्या. ह्या ओळखीपाळखी होण्याचें मुख्य कारण त्याचें सुरेल कंठाचें कवितागायन होय.

विद्वान् मर्मज्ञ लोकांना त्याच्याविषयीं पुष्कळ आदर वाटे; कारण तो प्रतिभाशाली कवि होता. प्रतिभेपुढें पढिक विद्वत्तेची काय मातब्बरी ? हें ओळखून विद्वान् लोक त्याला तो स्वत: विद्वान् नसतांही मान देत. परंतु त्याला त्या मानाची मोठीशी पर्वा वाटत नसे. त्याला वाटे, आपणही एक बडे विद्वान् आहों व शिवाय प्रतिभाशाली कवि आहों. आपण बरोबरीच्या पढिक विद्वानांची इतकी प्रतिष्ठा कां म्हणून मानावी ?

श्रीमान संस्थानिकांना व राजे—रजवाडयांना त्याचें कवितागायन ऐकून आनंद वाटे. ते त्याला करमणुकीसाठीं वारंवार कवितागायनाकरितां निमंत्रण देत व तोही हौशीनें त्या निमंत्रणाचा स्वीकार करी. आपण जेवून झाल्यावर भिकाऱ्याला अथवा दारच्या कुत्र्याला घांसभर अन्न ज्याप्रमाणें टाकतों, त्याप्रमाणेंच श्रीमंतापाशीं कवि, गवई वगैरे गुणी जनांची किंमत असते. कारण श्रीमंतांना संपत्तीच्या जोरावर जसे कुत्रे, तसेंच कवि, गवई वगैरे पाळतां येतात अथवा मिंधे करून ठेवतां येतात. हें सारें त्याला जरी माहीत असलें, तरी तो तिकडे लक्ष न देतां श्रीमंतांकडून आपल्या काव्यगायनाप्रीत्यर्थ अथवा काव्यरचनेप्रीत्यर्थ काय मोबदला मिळे त्यासाठीं, शितांकरितां भुतें नाचतात तसा नाचे. त्यानें अशा अनेक श्रीमंतांवर व राजेरजवाडयांवर स्तुतिपूर्ण कविता रचून त्यांचें गायन करून थोडीशी माया जवळ केली होती. आणि वर्तमानपत्रें तर आपले रकाने भरून

काढण्यासाठीं त्याचे फोटो आणि त्याचीं वशिलेबाज स्तुतिवर्णनें छापून त्याच्या नांवाची फुकट जाहिरात करीत होतीं.

अशाच एका प्रसंगीं त्याच्या परिचयाच्या म्हणजे त्यानें भरमसाट स्तुति करून परिचय करून घेतलेल्या एका संस्थानिकाच्या राजवाड्यांत पोलिटिकल एजंटसाहेबाचें आगमन व्हावयाचें ठरलें. त्या समारंभानिमित्त अनेक मोठमोठ्या संस्थानिकांना व सरदार-इनामदारांना निमंत्रणें होतीं. त्यांतच त्याला अर्थात् तो कवि म्हणून कवितागायनार्थ निमंत्रण होतें.

त्याला वाटलें कीं आतां आपलें एवढया मोठया राजमंडळासमोर–त्यांतल्या त्यांत सर्व संस्थानिकांची सासूबाई जे पोलिटिकल एजंटसाहेब त्यांच्यासमोर कवितागायन होणार ! हें आपलें केवढें मोठें भाग्य उदयाला आलें ! तो लगेच आपल्याच हातानें आपली पाठ थोपटून हर्षभरानें सायकलीवर स्वार झाला, व जो कोणी इष्टमित्र भेटेल त्याला तें निमंत्रणपत्र दाखवीत सुटला. अर्ध्या वाटेंत सायकलींतील हवा निघून सायकल नादुरुस्त झाली, त्याबरोबर सायकल तशीच एका दुकानांत दुरुस्तीला टाकून भाड्याचा टांगा त्यानें केला व सर्व इष्टमित्रांचीं घरें-कचेऱ्या-हॉटेलें पालथीं घातलीं.

आणि सायंकाळीं तो ठरल्या वेळीं राजेसाहेबांच्या बंगल्यावर गेला. त्यानें दरवाजात पाऊल टाकतांच राजेसाहेबांचा कुत्रा त्याच्याकडे डोळे वटारून पाहूं लागला. मुक्या जनावराचे मनोभाव ओळखणाऱ्या कोणा पशुमानसशास्त्रज्ञानें तेव्हां जर त्या कुत्र्याकडे पाहिलें असतें, तर त्या दरिद्री कवीनें आंत पाऊल टाकतांच आपणाला नमस्कार केला नाहीं, त्यामुळें आपला अपमान झाला, या जाणिवेनें तो यःकश्चित कुत्रा चिडल्याचें त्या मानसशास्त्रज्ञाला दिसून आलें असतें. बरोबरच आहे. तो कुत्रा झाला तरी राजेसाहेबांचा आवडता कुत्रा तो !

कुत्रा रागावलेला पाहून तो कवि आपलें कवितांचें बाड खांकोटीला मारून दूर दरवाजाबाहेर थरथर कांपत उभा राहिला. तोंच राजेसाहेबांनीं चटकन् तिथें येऊन कुत्र्याला आवरलें, व कवीला बैठकखान्यांत योग्य जागीं बसविण्याची सूचना आपल्या कारभाऱ्यांना दिली. कारभाऱ्यांनीं आपल्या चपराशाकडे पाहिलें व चपराशानें कवीला अगदीं मागच्या रांगेंत एका कोपऱ्यांत नेऊन बसविलें.

पोलिटिकल एजंटसाहेब यावयाला अजून पांचदहा मिनिटें अवकाश होता. तेवढया वेळांत राजेसाहेब व इतर राजशाही पाहुणे त्या कुत्र्याला कुरवाळून खेळविण्यांत दंग होते. त्या कुत्र्यानें लाडिकपणाच्या भरांत तीन चार राजामहाराजांचीं तोंडेंही चाटलीं. पण त्यांना त्यांत आनंदच वाटला. कवि कोपऱ्यांतून तें सारें पहात होता.

ठरल्या वेळीं पोलिटिकल एजंटसाहेबांची मोटार आल्याची इषारत मिळाली. त्यांच्या स्वागतार्थ यजमान राजेसाहेब व इतर सर्व पाहुणे सामोरे गेले. हलकेसलके शिपाईप्यादे मात्र जगाच्या जागींच अदबीनें उभे होते, कवि सामोरा जाऊं लागला तेव्हां एका शिपायानें त्याला पुढें न जाण्याची सूचना केली.

" कां ? " कवीनें रागानें विचारलें.

" राजेसाहेब रागावतील; फालतुक माणसांनीं सामोरे जावयाचें नाहीं." शिपाई उत्तरला.

कवि हिरमुसला होऊन जागच्या जागीं बसला.

महाराज बड्या पाहुण्यांना सामोरे निघाले तेव्हां त्यांचा आवडता कुत्राही नेहमींच्या संवईप्रमाणें पुढें पुढें धावूं लागला. त्याची नेहमींची लाडीकपणाची खोडच कीं राजेसाहेबांच्या मोटारींत राजेसाहेबांच्या अगोदर जाऊन बसावयाचें. त्या झोकावर तो आजही पुढें धांवला.

तेव्हां राजेसाहेबांची मोठीच तारांबळ उडाली. त्यांनीं त्या कुत्र्याला आवरावें, कीं बडया पाहुण्यांचें स्वागत करावें ? तरीही ते प्रथम समजुतीनें व त्या समजुतीचा कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून मग रागानें कुत्र्याला मागें जावयाला सांगत होते. पण कुत्रा तें कांहीं केल्या ऐकेना. राजेरजवाड्यांसारख्या थोर लोकांच्या क्षणोक्षणीं पालटणाऱ्या लहरी त्यांच्या सभोंवारच्या माणसांनाही कळत नाहींत, तर त्या कुत्र्यासारख्या अजाण प्राण्याला काय कळणार ?

अखेर अगदीं निरुपाय झाला तेव्हां राजेसाहेबांनीं कुत्र्याला रागाच्या भरांत जोरांत लाथ हाणली. आपला धनी आपलें त्याच्यावर इतकें प्रेम असतांना व आपणांला नेहमीं आंगाखांद्यावर घेऊन कुरवाळीत असतांना आज गोऱ्या कातडीचा एक बडा पाहुणा आला, त्याच्या देखत त्या धन्यानें आपणाला लाथ मारली; ह्या अपमानाच्या जाणिवेनेंच कीं काय,

बिचारा कुत्रा मुकाटपणें तेथून उठला व धन्याची शिग्रामगाडी ठेवण्याच्या तबेल्यांत वळवणीच्या आडवशाला जाऊन बसला. त्याला धन्याची लाथ कांहीं फारशी जोरानें लागली नव्हती. पण त्या लाथेच्या मारापेक्षां त्या अपमानाच्या वेदनाच त्याला असह्य झाल्या होत्या.

पोलिटिकल एजंटसाहेब मोटारींतून लवाजम्यासह खालीं उतरले. यजमान राजेसाहेब व इतर निमंत्रित थोर थोर लोक यांनीं त्यांचें यथोचित स्वागत केलें. यजमान राजेसाहेब पाहुण्यांना घेऊन सुशृंगारित बैठकखान्यांत गेले. पाहुणे तेथें सपत्नीक उच्चासनावर विराजमान झाले. सर्व सभासद त्या सभेंत अगदीं अदबीनें आपापल्या जागीं बसले होते.

कोपऱ्यांत माशा मारीत बसलेल्या कवीला प्रथम वाटलें कीं आतां पाहुण्यांचें संगीत अभिनंदन करण्याचा मान आपणाला मिळेल. पण नाहीं. तो मान यजमानराजेसाहेबांची एक विधवा बहीण कवयित्री म्हणून गाजली होती तिला मिळाला. तिनें जी कविता तिथें गाऊन दाखविली, ती स्वकृत म्हणून कळतांच तिची सर्वांनीं मुक्तकंठानें प्रशंसा केली. बड्या पाहुण्यांनींही त्याबद्दल धन्योद्गार काढले. त्या लोकांना काय माहीत कीं वहिनीसाहेबांनीं पूर्वोक्त कोपऱ्यांतील कवीला पैसे देऊन त्याच्याकडून ती कविता करून घेऊन पूर्वींच आपल्या नांवावर छापली होती म्हणून !

बरोबर सायंकाळीं तीन वाजतां बडे पाहुणे राजेसाहेबांच्या राजवाड्यांत आले. कलावंतिणीचें नृत्यगायन व परस्परांची प्रशंसा करणारीं भाषणें, अल्पोपाहार, हारतुरे, अत्तर–गुलाब वगैरे सर्व शिष्टाचार आटोपून व यजमानांकडून नजराण्यादाखल भारी किंमतीचा मोत्यांचा कंठा मिळवून ते साडेचार वाजतां माघारे गेले. तेव्हां कोठें सर्वांना अंमळ हायसें वाटलें.

लगेच राजेसाहेब आपल्या कुत्र्याचा शोध करूं लागले.

तोंच एका जहागीरदार पाहुण्यांनीं म्हटलें, “ अहो, आतां आपण कविराजांचें कवितागायन ऐकून जिवाची करमणूक तर करूं या खरी !”

तोंच दुसरा एक इनामदार पाहुणा म्हणाला, “ बडे पाहुणे गेल्यावर त्याच बैठकींत कवितागायनाची शिळी कुरवंडी कविराजाच्या तोंडावरून आपण कशी ओंवाळायची ?”

कवीला तें ऐकून वाटलें कीं हे लोक आतां नसत्या मानापमानाच्या भरीं पडून आपल्या कवितागायनांत खो घालणार. तो लगेच उभा राहून मोठ्यानें ओरडून म्हणाला, “ कांहीं हरकत नाहीं. हा कवि मानापमानाचा भुकेला नसून रसिकांच्या सेवेचा भोक्ता आहे.”

अखेर त्या सभेच्या उष्ट्या पत्रावळीवर त्या कवीनें पोटभर कवितागायन ओरपलें, व शेवटीं सर्वांचा निरोप घेऊन आनंदानें तो बाहेर पडला.

राजेसाहेब आपल्या आवडत्या कुत्र्याचा शोध करण्यांत गुंतले असल्यानें ते मात्र कवीला निरोप देऊं शकले नाहींत.

— २ —

कवि जो तेथून बाहेर पडला, तों त्यानें प्रथम आपल्या बिऱ्हाडीं जाऊन आपल्या कवितागायनाचा सुरस अहवाल लिहून काढला, व टेबलाच्या खणांतून आपल्या फोटोचा ब्लॉक शोधून काढून तो ब्लॉक आणि तो अहवाल खिशांत टाकून तो तडक सायकलीवर बसून ‘बुद्धिप्रकाश’ दैनिकाच्या कचेरींत गेला. लगेच त्यानें आपल्या फोटोचा तो ब्लॉक व तो अहवाल खिशांतून काढून त्या ओळखीच्या संपादकापाशीं दिला.

“ फार उशीर झाला बुवा ! उद्यांचा अंक बहुतेक तयार झाला आहे. आतां कसें करूं ? नुसता हा मजकूर घालूं म्हणाल तर उद्यांच्या अंकांत घालतां येईल. पण फोटो जर याला हवा असेल, तर मात्र परवां ! ” संपादक म्हणाला.

“हरकत नाहीं. पण फोटो आणि मजकूर एकदम येऊं द्या. त्याखेरीज मजा नाहीं. तुम्हींच म्हणतां ना; कीं चित्रांनीं चित्त वेधतें ?”

याप्रमाणें संभाषण झाल्यावर कवि आपल्या बिऱ्हाडीं माघारा गेला.

इकडे राजेसाहेबांना दुसऱ्यां दिवशीं सकाळीं त्यांच्या कुत्र्याचा शोधा लागला. पण तो तिकडे तबेल्यांतील वळचणीला मरून पडलेला !

राजेसाहेबांना त्यांच्या कुत्र्याचा मानी स्वभाव माहीत होता. त्यांनीं ओळखलें कीं त्याला कालचा अपमान असह्य झाल्यामुळें त्यानें त्रागा करून आत्महत्या केली असावी. लगेच त्यांनीं फोटोग्राफरला बोलावून त्या मृत

कुत्र्याला म्हणजे त्याच्या प्रेताला मऊ मखमली खुर्चीवर त्याचा बसवून फोटो काढून घेतला.

लगेच राजेसाहेबांचे कारभारी राजेसाहेबांच्या तांतडीच्या आज्ञेवरून ‘ बुद्धिप्रकाश ’ दैनिकाच्या संपादककचेरींत गेले. संपादकांनीं तो फोटो घेऊन दुसऱ्या दिवशींच्या अंकांत छापण्याचें आनंदानें कबूल केलें, व तो फोटो ताबडतोब ब्लॉक करण्यासाठीं पाठविलाही.

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कवि आपला गुणगौरव व फोटो प्रसिद्ध झाला कीं नाहीं हें पाहाण्यासाठीं पहांटेलाच उठून ‘बुद्धिप्रकाश’चा ताजा अंक विकत घेऊन उघडून पहातो, तों त्याला त्याच्या स्वतःच्या फोटोपाशींच त्या कुत्र्याचा फोटो त्याच्या मानीपणाच्या वर्णनासह छापलेला दिसला. !

# तो सुप्रसिद्ध चित्रकार कसा झाला ?

चित्रकार भगवंतरावांना मी बऱ्याच दिवसांपासून ओळखीत होतों. अर्थात् चित्रकार म्हणून नव्हे, तर चित्रकलेंतील ठोंबे म्हणून. त्यांचा माझा परिचय झाला त्या दिवसापासून हरघडी मला त्यांचा आग्रह कीं मीं त्यांचीं चित्रें माझ्या पुस्तकांतून छापावीं आणि त्यांना पुढें येण्याला संधि द्यावी.

नुसतें एवढें सांगूनच भगवंतराव थांबले नाहींत; तर माझी खात्री पटण्यासाठीं त्यांनीं एके दिवशीं मला मुद्दाम चहाला बोलावून आपण काढलेलीं कांहीं निवडक चित्रें व कांहीं तैलचित्रेंही मला दाखविलीं. त्या चित्रांत अर्थात् पाहाण्यासारखें कांहींच नव्हतें. बऱ्याचशा महाराष्ट्र-कवींचें कवितागायन ऐकून त्या बेचव वातावरणांत जीव जसा गुदमरून जातो, त्याप्रमाणें भगवंतरावांचीं चित्रें पाहून मला वाटलें. पण करणार काय ? मी तेथें पाहुणा होतों.

त्या चित्रदर्शनाच्या माऱ्यांतून कसाबसा शीरसलामत बचावल्यावर, तसलीं आणखीं चित्रें पहाण्याचें नशिबीं येऊं नये म्हणून मीं तेथें भिंतीवर टांगलेल्या तैलचित्रांवर माझी नजर चिकटवून टाकली. तेथेंही आगींतून उठून फोफाट्यांत पडावें तशी माझी स्थिति झाली खरी. तरी पण मीं ती इतर जाचाला भिऊन मुकाट्यानें सहन केली.

" कशीं काय तीं ऑईल पेंटिंग्ज आहेत ?" भगवंतरावांनीं विचारलें.

" फार सुंदर आहेत. " मी म्हणालों, " हें पहिलें ऑईल पेंटिंग कुणाचें दामोदरलाल नगरशेटांचें काय ?"

" नव्हे, नव्हे, ते सयाजीराव महाराज."

" आणि हें दुसरें ? "

" ते टिळक आहेत. "

" अस्सें !" असें म्हणून मीं एक सुस्कारा सोडला. खरोखरच तीं चित्रें नांव सांगूनही ओळखतां येऊं नयेत इतकीं वस्तुस्थितीला सोडून होतीं. त्यांचा हुबेहुबपणा माझ्या मनाला पटला नाहीं याचें माझ्या प्रश्नावरून भगवंतरावांना वाईट वाटलें असेल कीं काय, ह्या विचारानें माझ्या मनाला चिमटा घेतला. अजून एक तैलचित्र ओळखावयाचें शिल्लक होतें. पहिलीं दोन चित्रें ज्या अर्थीं मोठ्या माणसांचीं होतीं, त्या अर्थीं तें तिसरें चित्रही तशाच कोणातरी मोठ्या माणसाचें असावें असें अनुमान मीं केलें. पण त्या तिसऱ्या व्यक्तीला कोणता मोठा माणूस ठरवावें हेंच मला कळेना. मी विचारलें, " हे कोण ? मालवीय काय ? "

" छे, छे, ते सोमवार पेठेंतील एक व्यापारी आहेत. " भगवंतराव उत्तरले.

" थेट मालवीयांसरखे दिसतात. " मी म्हणालों.

" आपणाला लोकांनीं मालवीय म्हणावें अशी त्यांना फार हौस आहे. म्हणून मीं दोघांच्या चेहऱ्यांत तितका सारखेपणा ठेवला आहे." भगवंतराव उत्तरले. गिऱ्हाइकाला जसें दिसावें असें वाटतें, तसें त्याचें चित्र काढून देणारा चित्रकार हाच मला प्रथम भेटला.

तोंच भगवंतराव पलीकडच्या खोलींतून ज्यावर पेन्सिलीच्या रेघोट्या ओढल्या आहेत असा मोठा कॅन्व्हास आणून मला दाखवीत म्हणाले, " हें पहा मीं सर चंदूलाल खुशालचंदांच्या पत्नीचें ऑइल पेंटिंग करावयाला घेतलें आहे. शेटजी एथले एक प्रसिद्ध कोट्याधीश व्यापारी आहेत. धुरंधर–हळदणकरांपासून सर्व रथीमहारथी चित्रकारांकडून शेटजींनीं आपलें व आपल्या पत्नीचें अशीं ऑइल–पेंटिंग्ज करून घेतलीं; पण त्यांतलें एकही त्यांना आवडलें नाहीं. परवां त्यांची माझी सहज मुंबईहून येतांना कल्याणच्या प्लॅटफॉर्मवर गांठ पडली, व त्या पहिल्याच भेटींत माझ्या चित्र-कलानैपुण्याविषयीं त्यांनीं ट्रायल म्हणून आपल्या पत्नीचें ऑइल पेंटिंग तूर्त मला करावयाला दिलें आहे. याचा मोबदला ठरतांना अवघा पांचशें ठरला आहे. पण शेटजी कुबेराचे अवतार आहेत; खूष झाल्यावर काय देतील आणि क्या नाहीं ! "

मरणाऱ्या माणसाच्या अंगावरील सुजेप्रमाणें भासणाऱ्या स्वःच्या खोडसाळ मोठेपणाचें एवढें मोठें दडपण भगवंतरावांनीं माझ्या तोंडावर घातल्यावर मला अवांतर ब्र काढण्याला तोंड तरी कोठें उरलें ?

तेवढ्यांतच चहा आला. चहा पिऊन झाल्यावर मी कशीबशी सुटका झाली म्हणून घरी निघालों, तेव्हां भगवंतरावांनीं दरवाजांत येऊन मला सांगितलें, "तुमच्या नव्या कादंबरीवर दर्शनीय चित्र घालायला अगदीं सुंदर असें वॉटर–कलर–पेंटिंग मी चार पांच दिवसांत आणून देतों."

ही आपत्ति आपणांवर कोसळेल तेव्हां पाहतां येईल असें मनांत म्हणत मीं त्यांना सांगितलें " वाः ! वाः ! अवश्य आणून द्या. "

× × ×

भगवंतराव तेवढी पांच दिवस तरी वाट कशाला पाहातात ? तिसऱ्याच दिवशीं त्यांनीं चित्र या संज्ञेनें पांढऱ्यावर काळें केलेला एक कागद मला आणून दाखविला. हें चित्र त्यांनीं कोणत्या प्राण्याचें काढलें असावें असा मी मनांत विचार करतों आहें, तोंच त्यांनीं मला प्रश्न केला, " ही सुंदर स्त्री तुमच्या कादंबरीवर शोभून दिसेल नाहीं ? "

खरोखर मला तेव्हां हंसूं आवरेना. स्त्रीसारखें तें चित्र वरवर दिसत होतें एवढेंच, पण हाताला बोटें होतीं सहा आणि चेहरा देखील......थोडक्यांत सांगावयाचें तर एखादा लांकडी मुखवटा समोर ठेवून तें चित्र काढलेलें दिसत होतें. पण एक पेला चहा पिऊन भगवंतरावांचा मिंधा झालेल्या मीं त्या चित्राला एकदम वाईट कसें म्हणावें ? मीं नुसतें मोघम म्हटलें, " ह्या चित्रांत कांहीं सुधारणा पाहिजेत. "

" काय काय सुधारणा पाहिजेत तें सांगा म्हणजे ताबडतोब करून देतों. " भगवंतराव उत्तरले.

मी भीत भीत उत्तरलों, " ह्या एका हाताचीं बोटें सहा आहेत; आणि हातांचे पंजे माकडाच्या पंजांसारखे दिसतात. दोन हातांची व दोन पायांची लांबीरुंदीही सारखी नाहीं. आणि बाई डाव्या पायाची मांडी घालून बसलेली दाखविली असतांही तिचा डावा पाय मांडीखालीं झांकला गेला असतांना गुडघ्यापुढील डाव्या पायाची लांबी सबंध उजव्या पायाइतकी

दिसते. वक्षस्थल ह्या बाईला मुळींच नाहीं म्हणून कोंवळी पोरगी म्हणावी, तर चेहरा पंचेचाळीस वर्षे वयाच्या बाईसारखा दिसतो...."

" समजलों समजलों, तुम्हांला काय पाहिजे तें मी समजलों. मी अजिबात दुसरेंच चित्र काढून परवांच्या दिवशीं आणून देतों. " ते म्हणाले.

मींही त्यावर कांहींतरी सूचना करावयाची म्हणून म्हटलें, " तुम्ही पुढें मॉडेल ठेवून चित्र काढावें म्हणजे बरें पडेल. "

यावर " बरें आहे " असें म्हणून भगवंतराव निघून गेले.

— २ —

पुन्हा तिसऱ्या दिवशीं भगवंतरावांची स्वारी नव्या चित्रासह हजर! तें चित्र पाहातांच मला पुन्हा हंसू कोसळलें. शाळेंतील मुलांना माणसाची आकृति समजावून देण्यासाठीं निरनिराळे अवयव एकच जमवून ही स्त्री तयार केली आहे कीं काय असा मला भास झाला. मात्र पूर्वींच्या चित्रांत मीं दाखविलेल्या सर्व चुका या चित्रांत सुधारण्याचा प्रयत्न भगवंतरावांनीं केला होता. हाताचीं बोटें इतकीं कांहीं जाडजूड आणि आंखूड केलीं होतीं कीं जणूं कांहीं तीं महारोगानें गळून पडलीं होतीं. पूर्वींच्या चित्रांतील डोळे मोठे आहेत असें मी म्हणालों होतों म्हणून कीं काय, या चित्रांतील डोळे हत्तीच्या डोळ्यांपेक्षांही बारीक काढले होते. आणि सौंदर्य! आंधळा तरी त्या बाईशीं लग्न करील कीं नाहीं याची मला शंका उत्पन्न झाली.

" मॉडेल समोर ठेवून हें चित्र तुम्हीं काढलेंत का ?" मीं भगवंतरावांना विचारलें.

भगवंतराव उत्तरले,"माझ्या मुलीलाच मीं मॉडेल म्हणून बसविली होती."

" तिचें लग्न झालें आहे काय ?"

" नाहीं. व्हायचें आहे."

" तर मग लग्न होईतों तरी असें कृपा करून कोणाला सांगूं नका. तुमच्या मुलीला मीं पाहिलें आहे, आणि ती इतकी कुरूप खास नाहीं. पण तुमच्या सांगण्यामुळें एखाद्याचा तसा गैरसमज व्हायचा !" मी म्हणालों.

माझ्या स्पष्टवक्तेपणाचा एका परीनें इष्ट पण दुसऱ्या परीनें अनिष्ट परिणाम

झाला. इष्ट परिणाम असा कीं भगवंतराव रागावून गेल्यामुळें मागची एक ब्याद टळली; आणि अनिष्ट परिणाम असा कीं निष्कारण एका मनुष्याचें मन दुखवलें गेलें.

× × ×

या गोष्टीला दोन महिने झाल्यानंतर एके दिवशीं पुण्याच्या वर्तमानपत्रांत मीं पुढील बातमी वाचली :

"पुण्याचे सुप्रसिद्ध श्रीमान् व्यापारी शेठ सर चंदूलाल खुशालचंद्र यांच्या बंगल्यावर काल एक गोड समारंभ घडून आला. लेडी चंदूलाल यांच्या भव्य तैलचित्राच्या अनावरणसमारंभानिमित्त मोठमोठे सरकारी अधिकारी व बहुतेक सुप्रसिद्ध नागरिक तेथें उपस्थित होते. लेडी चंदूलालचें तें तैलचित्र पुण्यांतील सुप्रसिद्ध चित्रकार श्री. भगवंतराव भोंगळभटे यांनीं तयार केलें असून तें फारच सुंदर वठलें आहे. त्या अप्रतिम कौशल्याबद्दल सरसाहेबांनीं त्या तैलचित्राच्या अनावरण प्रसंगीं प्रशंसोद्गार काढले, व रोख दहा हजार रुपये व एक हिऱ्याची आंगठी भगवंतरावांना बक्षीस दिली. त्याप्रमाणेंच भगवंतरांवाना आपले फॅमिली आर्टिस्ट नेमून त्यांना सरसाहेबांनीं दोन हजारांचें वर्षासनही नेमून दिलें आहे. प्रथितयश चित्रकार श्री. भगवंतराव हे आतां लवकरच हिंदी चित्रकलेचा उद्धार करण्याकरितां लंडनच्या रॉयल आर्टस् सोसायटींत टांगण्यासाठीं कांहीं रम्य चित्रें तयार करणार आहेत. सरसाहेबांच्या पुरस्काराखालीं श्री. भगवंरातव यांच्या चित्रांचीं प्रदर्शनेंहि फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड, अमेरिका वगैरे ठिकाणीं भरविण्याची व्यवस्था लवकरच होणार आहे. सदर समारंभांतली आणखी एक महत्त्वाची व गोड गोष्ट सांगावयाची ती ही कीं, लेडी चंदूलालनीं आपल्या तैलचित्रावर खूप होऊन 'सवाई राजा रविवर्मा' ही पदवी भगवंतरावांना बहाल केली व आपला गळ्यांतील कंठा काढून त्यांना बक्षीस दिला."

वरील वार्ता वाचून बर्फांत गारठलेल्या पक्ष्यासारखी माझी अवस्था झाली. भगवंतरावांच्या चित्रकला-नैपुण्याचा मगदूर मला जो कांहीं माहीत होता, त्याच्याशीं ह्या वार्तेचा मुळींच मेळ बसेना. एकदां वाटे, हे भगवंतराव भोंगळभटे दुसरे कोणी चित्रकार असावेत. पण भगवंतररावांनींच सर चंदूलाल

शेटजींचें नांव माझ्या समक्ष भेटींत घेतलें होतें; त्यामुळें वाटलें कीं हेच ते भगवंतराव. पण ह्या भगवंतरावांचा इतका गौरव ! मग ही वडाच्या झाडाला पिंपळाची पालवी फुटली, किंवा कोल्हीच्या पोटीं वाघीण निपजली, असेंच म्हटलें पाहिजे. तथापि असें नसेल कशावरून ?—माझ्या ओळखीच्या त्या भगवंतरावाकडून आपल्या पत्नीचें तैलचित्र नीट तयार होत नाहीं असें कळल्यावर सरसाहेबांनीं दुसऱ्या कोणा भगवंतराव नांवाच्या चित्रकाराला आपली ऑर्डर दिली असेल, आणि त्या भगवंतरावांचा हा बोलबाला होत असेल.

काय तो खरा प्रकार समक्ष पाहावा म्हणून मी अंगांत सद्रा घालून भगवंतरावांच्या घरीं जाण्यासाठीं बाहेर पडलों. आडव्या रस्त्यानें मी लक्ष्मीरोडवरील गणपतीच्या देवळाजवळ जाऊन पोहोंचतों तोंच डाव्या बाजूनें एक रोल्स-रॉईस मोटार येतांना मला दिसली. गणपतीच्या देवळापाशीं ती मोटार आली तेव्हां मीं सहजच आंत पाहिलें. तों त्या मोटारींत संख्येनें एकंदर चार माणसें होतीं. मागच्या बाजूला म्हणजे मालक-जागेंत जिचें वजन सुमारें तीनशें किंवा चारशें पौंड भरेल अशी एक मनुष्याकृति बसली होती. तिचा एकेक दंड माझ्या दोन मांड्यांएवढा होता. माझीच गोष्ट कशाला ? त्या मागील जागेपैकीं कमींत कमी सात अष्टमांश जागा त्या स्त्री-प्राण्यानें व्यापली असून उरलेल्या एक अष्टमांश जागेंत त्या बाईच्या मनगटाइतका जाड असा एक पुरुष अरकसांनीं अरकसलेल्या दोन लांकडांत पाचर ठोकावी त्याप्रमाणें अंग चोरून बसला होता. शरीराला शोभून दिसल्यासारखें त्या बाईचें शीरही प्रशस्त होतें. तिच्या गालाचीं पूर्वपश्चिम गोलार्धें इतकीं मांसानें फुगलीं होतीं कीं त्या प्रदेशांत झांकून गेलेल्या डोळ्यांचा शोध लावण्याला कोलंबसही अपुरा पडला असता. त्या बाईच्या उजव्या हातांतील करंगळींतील आंगठी जी मीं पाहिली, ती माझ्या एक वर्षाच्या मुलाच्या हातांतील सोन्याच्या कड्यापेक्षां परिघानें खास मोठी असेल. अशा त्या बाईला चोवीस वारी ताम्याचें एकेक पातळ लागत असेल अशी वाचकांनीं कल्पना केल्यास ती केवळच चुकीची ठरणार नाहीं.

ही मालक—जागेंतील दोन मंडळी वजा करतां पुढच्या बाजूला एक मोटारड्रायव्हर व माझे परिचित चित्रकार भगवंतराव बसले होते. मीं त्यांना

पाहिलें, त्यापूर्वींच त्यांनीं मला पाहिलें असावें. कारण आपण मोटारींत बसून मिरवत असतांना पहावयाला ओळखीचीं माणसें रस्त्यांत आहेत कीं नाहींत ही काळजी त्यांना होतीच. तशीं माणसें कोणी भेटल्यास त्यांच्याकडे मुद्दाम पाहून हंसून नमस्कार करण्याला भगवंतराव चुकत नव्हते.

त्यांतून मी तर जरा निराळा मनुष्य. मीं त्यांची त्यांच्याच तोंडावर टर केलेली. अशा मला लाजविण्याची संधी अनायासें चालून आलेली ते वांया कां दवडतील ? मला पाहतांच त्यांनीं माझ्याकडे पाहून हंसत हंसत मोटार थांबवावयाला सांगितलें.

मोटार थांबतांच भगवंतरावांनीं मला हांक मारली. मी आश्चर्यानें जवळ गेलों. त्याबरोबर त्यांनीं मला नमस्कार करून मोटारींतल्या मंडळींची व माझी ओळख करून दिली, " हे माझे हितचिंतक सर चंदूलाल खुशालचंद्र, आणि या त्यांच्या पत्नी लेडी लतिकाबाई. यांचेंच तैलचित्र मीं तयार केलें. त्याविषयींचा वृत्तांत आपण वर्तमानपत्रांत वाचला असेलच."

मीं लगेच शिष्टाचारासाठीं सरसाहेब आणि त्यांच्या पत्नी यांना नमस्कार केला, व नाटकांतील नक्कल पाठ म्हणून दाखविल्याप्रमाणें भगवंतरावांचीही प्रशंसा केली.

" हे एक खंदे लेखक व नांवाजलेले कादंबरीकार आहेत, " अशी माझी ओळख सरसाहेबांना करून देऊन भगवंतराव त्यांना आगंतुकपणें म्हणाले, " बाईसाहेबांचें तैलचित्र यांना एकदां पहावयाचें आहे." आपल्या शब्दाच्या गळाला मासा नेमका लागावा म्हणून ते पुढें म्हणाले, "बऱ्याचशा वर्तमानपत्रांचे संपादक यांच्या ओळखीचे आहेत. त्यांच्या मार्फत कालच्या समारंभाची सचित्र व सविस्तर माहिती सर्व वर्तमानपत्रांत येईल अशी तजवीज हे करतील."

भगवंतरावांचा हा गळेपडूपणा मला मुळींच आवडला नाहीं पण तेव्हां विरुद्ध बोलणें शोभलें नसतें म्हणून मी गप्प राहिलों. सरसाहेबांनीं मला आग्रहानें त्या दिवशीं आपल्या बंगल्यावर येण्याचें निमंत्रण दिलें, आणि मींही ' हो ' म्हटलें.

" किती वाजतां मोटार येऊंदे बरें ?" भगवंतरावांनीं प्रश्न केला.

" मोटार कशाला ? मी टांग्यांतूनच येईन. " मी उत्तरलों.

" नाहीं, नाहीं, मी मोटार अवश्य पाठवीन. " सरसाहेब म्हणाले.

" मी संध्याकाळीं तीन वाजतां शेटजींच्या घरीं जाईन व तेथून मोटार घेऊन आपल्याकडे येईन. " भगवंतराव म्हणाले, आणि पुन्हा एकदां उभयपक्षीं नमस्कार चमत्कार झाल्यावर मोटार निघून गेली.

मी मात्र तेव्हां आश्चर्यसागरांत असा बुडून गेलों होतों कीं हें गौडबंगाल आहे तरी काय ? पण मनांत म्हटलें, " पाहूं तर खरें सायंकाळीं जाऊन, मग काय तें कळेल."

## ३

आणि सायंकाळीं भगवंतरावांबरोबर मी सरसाहेबांच्या बंगल्यावर त्यांच्या मोटारींतून गेलों तेव्हां मला सर्व कांहीं कळलें.

दिवाणखान्यांत माझें स्वागत करण्यासाठीं सरसाहेब हजर होतेच. त्यांनीं अत्यंत आदरानें माझी उठाबस केली. एक दोन मिनिटांतच लेडी चंदूलाल आंतील दरवाजांतून कशाबशा बाहेर आल्या. त्यांना मोटारींत असतांना कांहीं मीं इतक्या पूर्णतेनें पाहिलें नव्हतें. बाहेर येतांच त्यांनीं किती वाजले हें पाहण्याच्या निमित्तानें आपलें मनगटी घड्याळ वर केलें. तें मींही पाहिलें पण मला त्यांच्या मनगटावर तें नीटसें दिसलें नाहीं. एखाद्या मोठ्या गुळाच्या ढेपीवर एकच माशी कुठेंतरी बसावी तसें तें घड्याळ मला दिसलें. त्यापेक्षां त्यांनीं एक लहानसें टाईमपीस किंवा निदान रासस्कोप सिस्टीम वॉच तेथें बांधलें असतें तर तें बरेंच खुलून दिसलें असतें.

मात्र त्या दिवाणखान्यांत येतांक्षणींच समोरच्या नक्षीदार टेबलावर एक पट्टा मला पडलेला दिसला व तो पट्टा धारण करणारा कुत्रा कुठें आहे याचा मी माझ्या मनाशीं विचार करीत होतों, तों तो शोध लेडी चंदूलालच्या आगमनानें आपोआपच लागला. त्यांनीं आपलें मनगटी घड्याळ काढून तें त्या नव्या पट्ट्यांत अडकवून देण्याला दासीला सांगितलें, तेव्हां मीं मनांत ओळखलें कीं तो पट्टा कुत्र्याच्या गळ्यांत बांधावयाचा नसून लेडी चंदूलालच्या मनगटावरील घड्याळाचा तो पट्टा आहे.

एकेका दिवसाचें माहात्म्य ठरलेलें असतें. ज्याअर्थीं त्या दिवशीं मी लेडी चंदूलालचें तैलचित्र पाहण्यासाठीं मुद्दाम तेथें गेलों होतों, त्याअर्थीं तिथें

जे काय वाभाडे निघणार, जें काय द्रौपदी–वस्त्रहरण होणार तें चित्रकलेचेंच, हें उघड होतें.

आणि त्याप्रमाणेंच झालेंही. सरसाहेब बोलतां बोलतां मुद्यावर येऊन म्हणाले. " आमचे भगवंतराव म्हणजे झांकलें माणीक आहे. मीं दिल्ली कलकत्ता सारीं शहरें पालथीं घातलीं व सारे आर्टिस्ट पाहिले. पण भगवंतरावांसारखा कुशल आर्टिस्ट साऱ्या हिंदुस्थानांत मला भेटला नाहीं. मीं अनेक मोठ्या आर्टिस्टांकडून माझ्या पत्नीचीं किती तरी ऑइल पेंटिंग्ज तयार करून घेतलीं. पण भगवंतरावांच्या सारखें सुंदर एकाचेंही आलें नाहीं. फार काय सांगूं तुम्हांला ? ऑइल पेंटिंग ही हस्तकौशल्याची गोष्ट आहे. पण फोटो ही तर यंत्रकला ना ? तो माझ्या पत्नीचा फोटोही उभ्या हिंदुस्थानांत एकाही फोटोग्राफरला चांगला काढतां आला नाहीं. त्याच फोटोवरून भगवंतरावांनीं हें ऑइल पेंटिंग केलें आहे. पण हें पहा, त्या फोटोपेक्षां किती सुंदर वठलें आहे ! " एवढें म्हणून सरसाहेबांनीं भिंतीवरच्या एका भव्य तैलचित्रावरील पडदा हातानें दूर सरकवला.

— ४ —

त्या चित्राकडे पाहातांच एखाद्या दशावतारी नाटकांत पूतना प्रगट व्हावी तसा मला भास झाला. अर्थात् त्या तैलचित्राकडे पाहून नव्हे, तर त्या तैलचित्राच्या जिवंत आलेख्याकडे पाहून ! मीं तें तैलचित्र पाहून अगदीं गारच झालों. त्याखालीं लेडी चंदूलाल असें नांव लिहिलें असतें तरी देखील कोणाला त्याची ओळख पटली नसती. एखाद्या फेरीविक्यानें रेड्याच्या शिंगाचें सामान म्हणून ओरडतां ओरडतां हस्तीदंती फणी पुढें करावी त्यांतला तो प्रकार होता. मीं त्या तैलचित्राकडे पहात थोडा वेळ डोकें खाजविलें तेव्हां मला आठवलें कीं, सिंगर स्युयिंग मशीनच्या कोणच्याशा कॅलेंडरवर काढलेली एक बाई अशीच आहे. तें कॅलेंडर भगवंतरावांच्या घरीं मी गेलों होतों तेव्हां तेथें पाहिलें होतें. मीं मनांत म्हटलें, भगवंतरावांनीं खूप केली. बाहेरून मात्र मीं त्या तैलचित्राची इतकी स्तुति केली कीं—कादंबरीकाराला ती कला कोणापासून शिकावयाला नकोच.

सरसाहेबांच्या घरचा पाहुणचार घेऊन मी पुन्हां माघारा भगवंतरावांच्यासह

मोटारींतून निघालों. मीं कांहीं तरी बोलावें अशी भगवंतरावांची अपेक्षा होती ती फोल ठरूं लागली. पण त्यांना धीर कुठला निघायला ! ते मला म्हणाले, "साहेब, तुम्हीं आज पाहिलें त्या ऑईल पेंटिंगमधली मख्खी तुम्हांला माहीत नाहीं. असें पहा, भाजीसाठीं हजार तोंडलीं जमविण्यापेक्षां एक भोंपळा फोडलेला उत्तम. मी कांहीं तितका कुशल चित्रकार नाहीं खरा; पण जसें गिऱ्हाईक भेटेल तसें त्याला काम देण्याखेरीज कोणी प्रसिद्धीला येत नाहीं हें मला माहीत आहे. सरसाहेबांना आपल्या पत्नीचें सुंदर चित्र पाहिजे होतें. त्यांनींच मला सौंदर्याचें उदाहरण म्हणून सिंगर स्युयिंग मशीनचें कॅलेंडर सुचविलें, आणि मींही हुबेहूब त्या कॅलेंडरची नक्कल करून सरसाहेबांना दाखविली. त्यांना ती आवडली आणि ते खूष झाले, मग माझें काय जातें ? हें जाहिरातीचें युग आहे. जाहिरातीच्या जोरावर मातीसुद्धां सोन्याच्या भावानें विकतां येते."

तेथला सारा आदरसत्कार स्वीकारून माघारा जातांना मीं माझ्या मनाशीं म्हटलें, 'मोठेपणाचा मार्ग मरणाच्या मैदानांतून जातो' असें गडकरी म्हणतात तें साफ खोटें. तो मार्ग कोठून जातो हें भगवंतरावांना विचारून घ्या. ते सांगतील कीं, 'तो जाहिरातीच्या मैदानांतून जातो.'

× × ×

आज त्या गोष्टीला तीन वर्षें झालीं. सुप्रसिद्ध चित्रकार श्री. भगवंतराव नुकतेच नूतन वर्षाच्या पदवीदानसमारंभांत रावसाहेब झाले असून ते स्वतःच्या मालकीच्या मोटारींतून फिरत असतात. आणि इतर मोठमोठे चित्रकार अर्थातच त्यांच्या नांवानें बोटें मोडीत पायांनीं हिंडत असतात.

# आंधळा !

सूर्यप्रकाशापासून आम्हांला अनुपम आनंद उपभोगावयाला मिळतो, हा काय चमत्कार आहे ? सूर्यकिरण पृथ्वीवर येऊन पोहोंचले कीं आपलीं अंतःकरणें ताज्या फुललेल्या फुलांसारखीं टवटवीत होतात. कां ? वर निरभ्र निळें आकाश पसरलें आहे, सर्व शेतें हिरवींगार दिसत आहेत, अशा निसर्गसौंदर्यांत रमतांना आम्हांला असें वाटतें कीं हें सर्व जीवन—हें सर्व सौंदर्य आपणाला देणारा जो सूर्य, त्याला जाऊन प्रेमानें मिठी मारावी !

ही झाली आम्हां डोळसांची अवस्था ! पण त्याच वेळीं आंधळ्यांना काय वाटत असतें याचा आपण कधीं विचार करतों का ? उभ्या जन्माच्या आंधारीआंधारांत खितपत ते बिचारे लोकांच्या दरवाजांत बसलेले असतात, अथवा भिक्षा मागत रस्त्यानें हिंडत असतात. सभोंवार सृष्टि इतकी सौंदर्यानें व आनंदीआनंदानें फुललेली असते; परंतु त्यांना त्याचें काय होय ? कोठें कोणी जनावर अंगावर चालून आलें तर तें चुकवितांना व कुत्र्यांच्या हल्ल्यापासून स्वसंरक्षण करतांना बिचाऱ्यांना ब्रह्माण्ड आठवतें.

सूर्य मावळला कीं त्या बिचाऱ्यांना कोणाच्या धाकट्या भावानें तर कोणाच्या धाकट्या बहिणीनें तर कोणाच्या डोळस म्हाताऱ्या आईमावशीनें हाताला धरून अथवा हातगाडीवरून ढकलीत घरीं आणावें. तेव्हां मुलीनें अथवा मुलानें म्हणावें, "आजचा दिवस किती छान होता ! हवा किती छान पडली होती !"

आणि तें ऐकून त्या अभागी आंधळ्यानें म्हणावें, "हवा छान पडली होती हें मीदेखील ओळखतों. कारण गाझीं बुबुळें आज एकसारखीं जत्रेतील मुलांसारखीं आनंदानं चुळबूळ करीत होती."

अशाच एका अभागी आंधळ्याचें करुणास्पद जीवन मला माहीत आहे. खरोखर, त्याच्याइतकें बलिदान करण्याची पाळी जगांत आंधळ्यांतदेखील फारच थोड्यांवर येत असेल.

तो कोंकणांतल्या एका शेतकऱ्याचा मुलगा होता. तो जन्मतःच आंधळा होता बिचारा! त्याचीं आईबापें जिवंत होतीं तोंवर तीं त्याची योग्य काळजी घेत. त्याच्या जन्मांधतेमुळें त्याची जी गैरसोय होत असे, ती अर्थातच कोणाला टाळून टाळतां येण्याजोगी नव्हती. एरव्हीं त्याचें जीवन मातापितरांच्या मायेच्या पांखरछायेंत सुखानें जात होतें. मात्र तीं मातापितरें वारलीं, आणि त्या दिवसापासून त्याच्या कष्टमय जीवनाला सुरुवात झाली. तो आपल्या बहिणीवर पोटासाठीं अवलंबून असल्यानें बहिणीच्या सासरच्या मंडळीला वाटे कीं काय पीडा आमच्या राशीला आली आहे ही! आमच्या ताटांतला घांस ओढून खायला ह्या बकासुराला देवानें ह्या जगांत पाठविलें तरी कशासाठीं न कळे!" तो जेवायला बसला कीं प्रत्येक घांसाबरोबर त्याला असे उपमर्दकारक अपशब्द गिळावेच लागत. जणूं काय तेंच त्याचें तोंडीलावणें! आणि त्याला अन्न जें दिलें जाई तेंहि शिळेंपाकें, मुंग्या आलेलें, आणि तेंहि जेमतेम त्याला जगावयाला पुरेल इतकें!

आणि तेंदेखील त्याचेंच बरें! त्याच्या मेहुण्यानें त्याच्या पित्याच्या मृत्युसमयीं त्या आंधळ्या जीवाची सर्व प्रकारची काळजी घेण्याचें कबूल करून त्याची थोडीशी—निदान तीनचार माणसांच्या निर्वाहाला निर्वेध-पणें पुरेल इतकी इस्टेट बळकावली होती!

त्या आंधळ्याची चर्या पांढुरकी फिक्कट दिसे. व डोळे मोठे निस्तेज कवड्या सारखे दिसत. घरांतील माणसांची मर्मभेदक बोलणीं खातांना तो इतका शान्त व स्तब्ध असलेला दिसे कीं कोणाला वाटावें त्याला त्यांची जाणीव तरी आहे कीं नाहीं?

दुसरें; ममताळुपणा म्हणजे काय याचा त्याला उभ्या आयुष्यांत अनु-भव नव्हता. त्याचीं मातापितरें त्याची काळजी घेत म्हणजे तरी काय; पोटचा गोळा सुखानें जगवण्यापुरती! त्याच्या आईला त्याचा तिरस्कार वाटे. कसली पीडा ही आपल्या कुशीला आली असें तिला वाटे. उप-

थोग तर कांहीं नाहीं; उलट कामधाम करतांना पायांत कोलदांडा घातल्या-सारखा! आईच ती असल्यानें तिनें त्याला ठार मारलें नाहीं हें निराळें. पण एकंदरींत गोठ्यांतल्या भाकड गाईसारखी अथवा लंगड्या पारड्यासारखी तिला त्याची अडचण वाटे हें कांहीं खोटें नाहीं.

त्याचा रोजचा कार्यक्रम असा कीं पानावर पडतील ते शिळेपाके चार घांस सेवन केल्यावर उन्हाळ्यांत घराच्या दरवाजापाशीं जाऊन बसावें. हिंवाळ्याच्या दिवसांत शेकोटीपाशीं जाऊन कोपऱ्यांत बसावें. आणि एकदां बसावें तें रात्रीपावेतों उठूं नये. तो कधीं कांहीं हावभाव करीत नसे कीं चर्येवर कांहीं भाव दाखवीत नसे. त्याचीं बुबुळें मात्र कधीं कधीं कांपरें भरल्यासारखीं आंधळेपणानें त्याच्या पापण्यांखालीं झांकलीं उघडलीं जात. त्याला कांहीं बुद्धि असेल का? कांहीं विचारशक्ति नसेल का? स्वतःच्या अस्तित्वाची कांहीं जाणीव नसेल का? होती कीं नव्हती याची कोण कशाला विचार करतें?

असा क्रम कांहीं वर्षे चालला होता. परंतु त्याच्या कोणतेंहि काम करण्याच्या असमर्थतेमुळें त्याला सर्वांनीं—घरच्यांनीं व बाहेरच्यांनीं हंसावें, त्याचा उपहास करावा; लहान मुलें पतंगाच्या पायाला दोरी बांधून त्याला हवेंत उडवून छळण्यांत मौज मानतात तसा ज्यानें त्यानें आपल्या निर्दय करमणुकीकडे त्याचा उपयोग करावा. घरचीं माणसेंच अशीं वागूं लागल्यावर शेजारीपाजारीहि तशींच वागलीं तर त्यांत नवल नाहीं.

त्या बिचाऱ्याच्या आंधळेपणावरून लोकांनीं नाना प्रकारचे विनोदी चुटके रचावे व म्हणावे. इतरांचे कशाला खुद्द घरचींच माणसें असें करीत. तो सर्वांच्या करमणुकीला उपयोगी पडावा म्हणून त्यांच्या मेहुण्यानें त्याला जेवण देण्याच्या वेळा मुद्दाम अशा मुक्रर केल्या कीं, त्या वेळीं शेजारीपाजारी शेतकऱ्यांना व खुशाल चेंडूंना नियमितपणें तेथें येऊन आपल्या जिवाची करमणूक करतां यावी. ही लोकांची करमणूक होत असतांना त्या बिचाऱ्या आंधळ्याला मरणप्राय दुःख होत असे. पण त्याची पर्वा कोण करतो? जगांत दुबळ्याचा वाली कोण आहे?

त्याच्या जेवण्याच्या—वेळीं त्यांतहि त्यांची करमणूक!—खरेंच विस्मय वाटण्यासारखी गोष्ट आहे ही! त्याचें ताट वाढलें गेलें कीं कोणी तरी घरचें

मांजर अथवा दारचा कुत्रा याला त्या ताटापाशीं आणून सोडावें. त्या जनावराला आंधळ्याचा दुबळेपणा तेव्हांच ओळखतां येई, व तें त्या अन्नावर सुखानें ताव मारूं लागे. आंधळा व मांजर अथवा कुत्रा एका ताटांत जेवतांना पाहून इतरांनीं खूप हंसावें. पण तेंहि अशा बेतानें कीं, आंधळ्याला त्याची दाद लागूं नये. मग त्या जनावराच्या खाण्याच्या मचमचीचा भास होऊन आंधळ्याला जाग मिळाली कीं त्याच्या हालचालीवरून त्या धूर्त जनावराला तेव्हांच त्याची जाग मिळे; व तें माराच्या भयानें अगोदरच तेथून पळून जाई.

मग मात्र प्रेक्षकांच्या आनंदाला व हास्याला पारावार उरत नसे. मग जो कांहीं धांगडधिंगा त्यांच्यांत चाले तो विचारूं नये. तें सर्व ऐकत असतांना तो बिचारा आंधळा उजव्या हातानें पोटांत कांटे भरल्यासारखें अन्न भरी, व डाव्या हातानें मांजराकुत्र्याला वारीत राही.

एखादेवेळीं त्या लोकांनीं त्याला बाटलीचीं बुचें, लांकडाचे तुकडे, घाणेरड्या झाडपाल्याला नांवापुरतें तिखटमीठ फांसून त्याच्यापुढें ठेवावीत ! त्या बिचाऱ्याला तें खरोखर काय आहे हें दिसत नसल्यानें तो जें कांहीं पानावर पडे तें मुकाट्यानें खाई !

असे कांहीं दिवस गेल्यावर लोकांना ह्याहि करमणुकीचा कंटाळा येऊं लागला. त्याच्या मेहुण्याला तर वाटे, ही पीडा एकदांची मरत कां नाहीं ? याला पोसायचें तरी आणखी किती दिवस ?त्या रागाच्या भरांत एकदां त्यानें त्या आंधळ्याला खूप मारलें, व त्याचे दोन्ही हात दोरीनें घट्ट बांधून ठेवले. तेव्हां आपली सुटका करून घेण्यासाठीं व शक्य तर आपला छळ करणाऱ्याला दोन तडाखे देण्यासाठीं आंधळ्यानें व्यर्थ धडपड केली, ती पाहून मेहुण्याच्या मनाची खाशी करमणूक झाली.

अखेर त्यांना एक नवी करमणूक सुचली. घरची मंडळी, आला गेला, शींवशेजारी, गांवांतील दरएक उडाणटप्पूदेखील येतां जातां त्याच्या तोंडावर एखाददुसरी चापट मारी. कोणी चिमटा घेई, कोणी खडे मारी, कोणी धूळ फेकी; अशा प्रत्येक वेळीं त्याच्या डोळ्यांच्या पापण्यांची उघड झांप काय ती होई, पण तेवढेंच. ह्या चांडाळांपासून स्वसंरक्षण करण्यासाठीं आपण कुठें व कसें लपावें हें कांहीं त्या बिचाऱ्याला कळत नसे. अशा

स्थितींत कोसळणारें आकाश पायांवर तोलून धरण्यासाठीं टिटवी पाय वर करून उताणी झोपते म्हणतात; त्याप्रमाणें लोकांचा अगदीं निकटचा हल्ला चुकविण्यासाठीं तो आपले बाहू पसरून धरी !

अखेर त्याला भीक मागण्याचा प्रसंग आला ! आला कसला ? त्याच्या मेहुण्यानें तो प्रसंग त्याच्यावर आणला. त्याला मोठ्या रस्त्याच्या बाजूवर नेऊन उभें करण्यांत येत असे. तेथें तो दोन्ही हात पसरून ' आंधळ्यावर दया करा ' असें ओरडत असे. तेवढ्यानें भागत नाहीं असें पाहून त्याला रस्त्याच्या कडेला एक वस्त्र पुढें पसरून बसविण्यांत येऊं लागलें. परंतु त्या गांवचे लोक इतके चैनी व परोपकार करण्याइतके सधन नव्हते; शिवाय ते ज्या आंधळ्याला आपला करमणुकीचा विषय बनवून चुकलेले, त्याच्यावर ते दया कोठली करतात !

नंतर मात्र त्या आंधळ्याचा सर्वांकडून विशेषत: घरांतून, व म्हणूनच बाहेरूनहि भयंकर द्वेष व छळ होऊं लागला. आणि अखेर तो बिचारा यातनांतच पुढें मरून गेला !

एका हिंवाळ्यांत थंडी इतकी कडाक्याची पडली कीं, गांवांतील विहिरी-तळ्याचें पाणीदेखील गोठलें पांखरें झाडावरून गारठून मरून खालीं पडलीं, व उभीं पिकें थंडीच्या कडाक्यानें करपून गेलीं. अशा वेळीं मोठ्या सकाळींच त्या आंधळ्याच्या मेहुण्यानें त्याला तेथून गांवांत दूर मोठ्या रस्त्यानें चालवीत नेलें, व भिक्षा मागण्यासाठीं त्याला तेथें उभें केलें. तेथें तो बिचारा सारा दिवस भिक्षा मागत उभा होता ! रात्र पडली व घरचीं माणसें ह्याची चौकशीं करूं लागलीं, तेव्हां मेहुणा उत्तरला, " मी शोधून शोधून दमलों; पण त्याचा कोठें तपासच लागत नाहीं." तो नुसतें एवढेंच सांगून थांबला नाहीं; तो वर आणखी असेंहि म्हणाला, " त्याच्या-साठीं कशाला इतकी काळजी करतां ! तो थंडीनें गारठल्यामुळें दुसऱ्या कोणाच्या तरी आश्रयानें दूर गेला असावा. त्यांत एवढें भिण्याजोगें काय आहे ? तो उद्यां जेवणाच्या वेळीं नेमका येतो कीं नाहीं पहा !"

परंतु दुसरा दिवस उजाडला, मावळला व तरी तो आंधळा कांहीं माघारा आला नाहीं.

तो तेथें थंडींत उभा राहून राहून कुडकुडला, थंडीनें अगदीं गारठून गेला, व आतां थंडींतून आपण कांहीं वांचत नाहीं अशी खात्री होतांच तो जिवाच्या आशेनें चालूं लागला. थंडीनें सभोंवर सर्वत्र कडाका उडवून दिल्यामुळें पाण्याच्या डबक्यांत पाय पडला तरी बर्फाच्या दगडाची ठेंच लागावयाची, व दगडाची ठेंच लागली तरी बर्फासारखा गार लागावयाचा. तशांत तो आंधळा ! त्या आपत्तींत त्याला घर कांहीं केल्या सांपडलें नाहीं. घर नाहीं तर नाहीं; निदान एखादें घर— निवाऱ्याची जागा तरी मिळावी ह्या आशेनें बिचारा एकसारखा वणवण करीत होता.

हिंडतां हिंडतां तो एका शेतांत शिरला. शेत आहे, पायाखालची वाट नाहीं, हें कळतांच तो त्यांतून बाहेर पडण्यासाठीं अधिक वळवळूं लागला, तों अधिकच गुरफटला गेला. इतका वेळ गारठलेल्या त्याच्या अंगाला शेतांतील रोपांचा ओलावा जखमी शरीरावर सुया टोंचाव्या तसा तापदायक होऊं लागला. त्याचे स्नायु इतके बधिर झाले व पाय इतके गारठून गेले कीं त्याच्या शरिराला पुढें गतीच मिळेना; त्यामुळें तो तेथेंच शेतांत मटकन खालीं बसला, तो बिचारा पुन्हां कांहीं उठला नाहीं !

त्या रात्रीचा थंडीचा कडाका तर पूर्वींपेक्षांहि भयंकर होता. त्या कडाक्यांत गतप्राण होतांना त्या बिचाऱ्याला अर्थातच भयंकर यातना झाल्या असतील. मरण लौकर येईल तर बरें असें मनांतून वाटत असतांहि मरण दूर उभें राहून हंसत असेल !

पण अखेर मरणाला दया आली म्हणा, कीं निसर्गाला दया आली म्हणा, तो आंधळा जेथें मटकन खालीं बसला होता ती जागा शेतांतील पडक्या विहिरीच्या कांठीची होती. ती विहीर त्या मध्यरात्रीच्या सुमारास केव्हां तरी कोसळली. अर्थात् तो विहिरींत पडला, व त्याच्या अर्धमेल्या शरीरावर दगडामातीचा ढिगारा पडला !

त्याच्या नातलगांनीं त्याचा शोध केल्याचा पुरता बहाणा केला. फार काय, त्याचा शोध लागत नाहीं म्हणून दुःखानें रडण्याचें नाटकहि त्यांनीं बेमालूम पार पाडलें.

आणखी आठवडाभर तरी थंडी तशीच कडाक्याची पडली. तरीहि एके दिवशीं त्या थंडींतूनच त्या शेताचा शेतकरी आपल्या शेताची हालहवाल पाहण्यासाठीं तिकडे गेला, तेव्हां दुरूनच कावळ्यांचा व गिधाडांचा भला मोठा थवा त्या विहिरीसभोंवार व वर आकाशांत घोंगावतांना त्याला दिसला. ते पक्षी पुन्हा पुन्हा वर आकाशांत भराऱ्या मारीत, व पुन्हा विहिरींत घुसत. हा काय प्रकार आहे याचा शोध लावण्यासाठीं शेतकरी विहिरीपाशीं गेला. आंत डोकावून पाहतो तों आंधळ्याचें अर्धेंअधिक कुरतडलेलें प्रेत त्याला दिसलें. त्याच्या डोळ्यांच्या तर अगदीं खांचा झाल्या होत्या. त्यांतील बुबुळांचें मांस कावळ्यांनीं केव्हांच बोंचून खाल्लें होतें !

आतां केव्हांहि आकाश निरभ्र दिसलें व हवा आल्हाददायक पडलेली दिसली, कीं मला त्या अभागी आंधळ्याची आठवण हटकून होते; व त्याच्या दुर्दैवी जीवनाचें भेसूर उद्वेगजनक चित्र जणुं मूर्तिमंत डोळ्यांसमोर उभें राहतें. त्याचें मरण अत्यंत भयंकर तर खरेंच; पण पुन्हा वाटतें, तें भयंकर मरण तरी एकपरीनें त्या बिचाऱ्याच्या यमयातनांचा शेवट करूं शकलें !

निदान त्याच्या नातलगांना तरी त्याच्या मरणामुळें अगदीं हायसें वाटलें यांत तर कांहींच शका नाहीं !

# माझा फोटो

' शतावरी ' या टोपण नांवाखालीं ' मेदिनी ' मासिकाच्या खास अंकांत आलेली माझी गोष्ट वाचून कोणाला काय वाटलें असेल तें वाटो; पण त्या गोष्टींतला फोटो पाहून मात्र अनेकांना अनेक प्रकारें कांहींतरी वाटलें, असें माझ्याकडे आलेल्या कांहीं पत्रांवरून व इतर अनेक बातम्यां-वरून मला वाटतें.

त्या फोटोचें रहस्य मी कशाला उकलून दाखवूं ? झांकली मूठ सव्वा-लाखाची.

गेल्या दहा तारखेला माझ्या मैत्रिणीकडून अचानक मजकडे एक पत्र आलें. त्या पत्रांत तिनें लिहिलें होतें, " मेदिनी ' मासिकाच्या संपादकां-कडून तुला देण्यासाठीं माझ्याकडे एक पत्र आलें आहे, तें यासोबत पाठवीत आहें. "

तें पत्र मीं कुतूहलानें उघडलें व प्रथम तें कोणीं लिहिलें असावें हें ओळखण्यासाठीं पत्राखालीं सही कोणाची आहे तें पाहिलें. ' पिकलेले फणस ' या नांवाच्या लघुकथासंग्रहाचा कोणी एक लेखक चंद्रशेखर या नांवाचा होता; त्याचें तें पत्र होतें.

त्या पत्रांत पुढील मजकूर होता.

"...आपली गोष्ट वाचली. आपण जरी त्या गोष्टीची भाषा अजिबात बदलून ' कळ्यांचे निःश्वास ' कर्ती विभावरी शिरूरकर आणि ह्या गोष्टीची लेखिका ह्या भिन्न आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, तरी ह्या दोन्ही लेखिका एकच आहेत हें वाङ्मयांतला मर्मज्ञ तेव्हांच ओळखूं शकेल......आपली व माझी ज़री प्रत्यक्ष ओळख नाहीं, तरी मी

जसा आपणाला नांवानें व आपल्या लेखनावरून ओळखतों, तशाच आपणही माझ्या लघुकथांवरून मला खास ओळखीत असाल. मी आपल्या वाङ्मयाचा मूळपासूनचाच चहाता आहें; व मी मुद्राशास्त्रांत आणि मानसशास्त्रांत पारंगत आहें. आपल्या पूर्वींच्या लिखाणावरून माझी जी कल्पना आपणाविषयीं झाली होती, ती मेदिनींत प्रसिद्ध झालेला आपला फोटो पाहून दुणावली आहे. आणि तितक्याच प्रमाणांत आपणांविषयींचा माझ्या मनांतील आदरही वाढला आहे. मी जर चित्रकार असतों, तर आपल्या वाङ्मयांत प्रतिबिंबित झालेल्या आपल्या स्वभावाच्या आधारें मीं कल्पनेनें आपली जी प्रतिमा चित्रित केली असती, तिच्याशीं आपल्या मेदिनींतील फोटोचें शेंकडा शंभर टक्के साम्य आहे. आणि त्यामुळेंच माझ्या मनांतील आपणांविषयींचें कुतूहल जोरानें जागृत झालें आहे.

आपणाशीं प्रत्यक्ष परिचय व्हावा अशी माझी अंतःकरणापासूनची इच्छा आहे. आपण एकवार कृपा करून मला भेटूं शकाल काय ? याचा अर्थ आपण मजकडे भेटीला यावें असेंच कांहीं मीं म्हणत नाहीं. आपणाकडे मला भेटीला बोलावलें तरी चालेल. आपल्या चिरमित्रत्वाची पवित्र भावनेनें अपेक्षा करणारा मी आहें, व आपल्या नांवाचा आज सर्वत्र जो बोलबाला होत आहे, त्याला बहुतांशीं मी कारण आहें हें मीं एथें मुद्दाम सुचवून ठेवतों. इतकी संवेदना आपणाविषयीं माझ्या हृदयांत कां उत्पन्न व्हावी हें मलाच कळत नाहीं. यांतही परमेश्वराचा कांहीं तरी गूढ हेतु असला पाहिजे. परमेश्वरी इच्छेचा पार कोणाला तरी कधीं लागला आहे काय ? पहिल्या वहिल्या पत्रमय भेटींत यापेक्षां जास्त लिहिणें अप्रासंगिक ठरण्याचा संभव असल्यानें मी जास्त कांहीं तूर्त लिहीत नाहीं. पत्रोत्तर अवश्य यावें....”

मांजराचे पंजे जसे त्याच्या पोटांत ओढलेले असतात, तसें चंद्रशेखरांचें तें पत्र मला वाटलें. त्या पत्रांतील खोडसाळपणा माझ्या मनाला तेव्हांच पटला. माझ्या लेखनावरून माझा स्वभाव ओळखणाऱ्या, व त्या ओळखीवरून माझें स्वरूपही ओळखून त्या ज्ञानाच्या जोरावर माझी स्तुति करणाऱ्या मनुष्याच्या उल्लूपणाचा आणखी कांहीं पुरावा पाहिजे असें मला तरी वाटत नाहीं.

पण सहज जर समाजांतील एका गाळींव रत्नाची ओळख होते आहे, तर ती टाळा कशाला? मीं माझ्या मनाशीं ठरविलें कीं, चंद्रशेखरांची ओळख करून घ्यायचीच.

परंतु ओळख झाल्यानंतर झांकली मूठ सव्वालाखाची उघडी होण्याचा संभव. आणि मग चंद्रशेखर कदाचित् माझ्याकडे येत नाहींसे व्हावयाचे. तसें मला व्हावयाला नको होतें. मला तो एक मनुष्यस्वभावाचा मासला चांगलाच पडताळून पहावयाचा होता.

त्या बाबतींत मीं अंमळ धाडसच करायचें ठरविलें, व चंद्रशेखरांना पत्र लिहिलें. त्या पत्रांत मीं त्यांच्या पिकलेल्या फणसांची ओतप्रोत स्तुति करायला विसरल्यें नाहीं. त्याबरोबर त्यांना असेंही लिहिलें कीं—तें काय लिहिलें तें खुलासेवार सांगून काय करायचें आहे? त्यांच्या पत्रांतील मुद्यांचीच पडसाद माझ्या उत्तरांत उमटला होता, एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे.

मात्र त्या उत्तरांत मीं एक खोंच मुद्दामच ठेवून दिली होती; आम्ही बायका फोडणीचें तेल नीट तापलें कीं नाहीं हें पहाण्यासाठीं त्यांत चार मोहरीचे दाणे टाकून पहात नाहीं का? त्यांतलाच तो प्रकार होता. मीं पत्र पाठविलें तें मुद्दामच माझ्या मैत्रिणीच्या पत्त्यावरून, कारण माझा खरा पत्ता मला मुद्दामच द्यायचा नव्हता. तीं सारीं कारणें मीं माझ्या मैत्रिणीला समजावून सांगितलीं, व तिला विश्वासांत घेऊन पुढें वागावयाचें ठरविलें. मेदिनींत माझा फोटो प्रसिद्धीसाठीं द्यावा कीं नाहीं या बाबतींतही मीं तिलाच पुढाकार घेण्याची संधि दिली होती.

चंद्रशेखरांना लिहिलेल्या त्या पत्रांत असें दर्शविलें होतें कीं, मी लग्न करीपर्यंत कोणत्याही पुरुषाला माझी ओळख करून देऊं इच्छित नाहीं. त्याचीं कारणें म्हणून मीं स्पष्ट लिहिलें होतें कीं, स्त्रियांची ओळख कोणतेही पुरुष जेव्हां करून घेऊं इच्छितात, तेव्हां त्या ओळखीच्या मागें डोकावणारा हेतु नेहमींच स्तुत्य असतो असें नाहीं.

आपले दोष आपणाला कबूल करायला काय हरकत आहे? एखाद्याला प्रथम लाथ मारून मागाहून त्याला नमस्कार करणें ही एक खोडच मला जडलेली आहे असें म्हटलें तरी चाललें. आणि माणसाला स्वभावधर्म थोडाच झांकून झांकतां येतो? माझ्या पत्रांतील सडेतोड नकारानें हिंपुटी झालेल्या

चंद्रशेखरांच्या मनाला लगेच हुरूप प्राप्त व्हावा म्हणून मी त्या पत्रांत अखेर लिहावयाला चुकलें नाहीं कीं, लग्नापूर्वी परपुरुषाशीं कोणत्याच प्रकारें मैत्री करूं नये अशी माझी इच्छा असतांही मी आपणाशीं पत्रव्यवहार करतें, ही बुद्धि देवानें मला कां दिली कळत नाहीं. यांत देवाचा कांही तरी उदात्त हेतु असला पाहिजे. हे माझ्या पत्रांतले अखेरचे शब्द फांसेपारध्याच्या फांसाला असणाऱ्या निसरगांठीवजाच होते.

माझें पत्र चंद्रशेखरांना पोहोंचतांच त्याचा मला हवा होता तोच परिणाम नेमका झाला, आणि त्यांनाही वाटलें असेल कीं, आपण खडा टाकला तो बरोबर लागू पडला. माझ्या पत्रांत मीं ईश्वरेच्छेविषयीं एक सूत्रमय वाक्य लिहिलें, तर चंद्रशेखरांनीं त्याला उत्तरादाखल लिहिलेल्या पत्रांत त्या सूत्रावर एक महाभारत रचलें. त्या साऱ्याचा निष्कर्ष हाच कीं, त्यांची माझी एकदां भेट व्हावी आणि आमच्या मैत्रीला दृढता यावी.

त्याच पत्रांत चंद्रशेखरांनीं आणखीही तारे तोडले होते. ‘ तुम्ही माझ्याशीं लग्न करतां का ? ’ असें त्यांनीं उघड उघड विचारलें नाहीं इतकेंच; पण ‘ तुमच्यासारखी सहचारिणी देवानें मला द्यावी ’ अशी देवाची प्रार्थना जी त्यांनीं त्या पत्रांत केली होती, तिचा अर्थ तोच.

तें चंद्रशेखरांचें पत्र वाचून माझी मैत्रीण मला म्हणाली, “ शतावरी ! इतका उल्लू मनुष्य हा दिसतो, याची आपण एकदां खाशी फट्फजिती करूं या ना ? ”

मी म्हटलें, “ तूं काय करशील त्याला माझी पूर्ण मान्यता आहे. ”

“ बैस तर मग खालीं, आणि लिही पत्र मी सांगतें तसें.” असें म्हणून माझ्या मैत्रिणीनें बळेंच मला खालीं बसविलें आणि माझ्याकडून चंद्रशेखरला पत्र लिहविलें. त्या पत्रांत मुख्य मजकूर चंद्रशेखरांनीं माझ्या भेटीला यावें असा विनंतिवजाच होता.

“ आतां पहा तो आशाळभूत कुत्र्यासारखा धांवत येतो कीं नाहीं तो ! ”

मी म्हणालें, “ येऊं दे तर खरा ! मग पुढचें पुढें पाहतां येईल. ”

अगदीं आमच्या अपेक्षेप्रमाणेंच झालें. चंद्रशेखरांचें मला उलटटपालीं पत्र आलें, त्यांत दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं भेटीला येतों असा मजकूर होता.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं चंद्रशेखर माझ्या भेटीला आले. भेटीची जागा मीं मुद्दामच माझ्या मैत्रिणीच्या घरची दिली होती. आणि भेटींत कसें कसें वागायचें हेंही आमचें आगाऊच ठरलें होतें.

चंद्रशेखर आंत आले तेव्हां माझ्या मैत्रिणीनें त्यांना आदरपूर्वक खुर्चीवर बसायला सांगितलें. मी जवळच खुर्चीवर बसून सारा प्रकार पहात होतें.

" आपण शतावरीबाईंना भेटायला आलांत काय ? " माझ्या मैत्रिणीनें विचारलें.

" होय. " चंद्रशेखर उत्तरले.

" पण त्या कांहीं जरूरीच्या कामासाठीं आजच मुंबईला निघून गेल्या."

" त्या केव्हां येणार आहेत ? "

" बहुधा एक दोन दिवसांनीं येतील. " माझ्या मैत्रिणीनें हंसतमुखानें म्हटलें, " आपला आणि शतावरीचा पत्रव्यवहार मीं सारा वाचला आहे. त्या बाबतींत मीं तुम्हांला एक गोड प्रश्न विचारला तर राग नाहीं ना येणार ? "

एखादा पांथस्थ वाट चालतां चालतां भुकेनें व्याकूळ होऊन पिकलेल्या आम्रफलांनीं ओथंबलेल्या आम्रवृक्षाखालीं विसांव्यासाठीं बसावा, आणि वृक्षावर बसून पिकलेल्या आंब्यावर चोंच मारतांना एखाद्या राघूला पाहून तो आंबा आतां पडेल आणि आपण झेलूं या आशेनें त्यानें दोन्ही हात पसरावे, तशी चंद्रशेखरांची तेव्हां अवस्था झाली होती. ते म्हणाले, " विचारा, अवश्य काय तें विचारा. "

" आपणाला शतावरीच्या गोष्टी खरोखरच आवडतात का ? "

" अर्थात्."

" आपण माणसाचें रूप, बुद्धि आणि गुण यांपैकीं जास्त महत्त्व कशाला देतां ? "

" तुमची माझ्याविषयीं काय कल्पना आहे ? माझ्या पिकलेल्या फणसांतील गोष्टी तुम्ही वाचल्या असतीलच. त्या गोष्टींत माझ्या अंतःकरणाचें पुरेसें आविष्करण झालेलें आहे असें मला वाटतें. "

" आपण रूपवैभव आणि धनवैभव याला गुणवैभव आणि बुद्धिवैभव

यांच्या मोलानें लेखायला मुळींच तयार नाहीं, अशी आपल्या गोष्टी वाचून माझी कल्पना झाली आहे. खरें आहे कां हें ? "

" माझ्या गोष्टी हें माझ्या अंतःकरणाचें प्रतिबिंब आहे. "

" मग आपण शतावरीच्या रूपाला तिच्या गुणाइतकें महत्त्व मुळींच देत नसाल. "

" हें काय विचारायला पाहिजे ? "

" आणि समजा, शतावरी कुरूप असली तरीदेखील ती तुम्हांला आवडेलच."

" हा प्रश्न इथें अप्रस्तुत आहे. मला हें सौंदर्याचें अवडंबर मुळींच मानवत नाहीं. "

" मग आतां एक प्रश्न विचारूं का ? "

" हो, विचारा. एक सोडून शंभर प्रश्न विचारा. "

" आपण शतावरीशीं लग्न करायला तयार आहांत का ? "

" शतावरी माझ्याशीं लग्न करायला तयार आहे का ? "

" समजा, ती तयार आहे. "

" तर मग मीही तयार आहें. "

" समजा, माझ्या शेजारीं बसलेली हीच शतावरी आहे; आहे हिच्याशीं तुमची लग्न करण्याची तयारी ? "

" अशी माझी थट्टा करतां ? "

" थट्टा नव्हे, तुमच्या गळ्याशपथ तुम्हांला सांगतें मी, हीच ती आपली शितावरी. "

" मी आंधळा आहे असें समजूं नका. मला डोळे आहेत. त्यांचा फोटो मी ' मेदिनी ' मासिकाच्या खास अंकांत त्यांच्या गोष्टींत पहिला आहे. माझी अशी फसवणुक कां करतां ? "

" आतां बोलेंच का ? मी तुमची फसवणूक करीत नाहीं. तुम्हीच तुमची फसवणूक करीत आहां. महाराज, आपण पाहिला तो शतावरीचा फोटो नसून तें एका कादंबरीवरील मलपृष्ठावरचें चित्र आहे. खरी शतावरी माझ्याजवळ बसली आहे हीच होय."

असें म्हणून माझ्या मैत्रिणीनें माझ्याकडे बोट दाखविलें. आम्हां दोघींनाही तेव्हां हंसूं आवरेनासें झालें.

चंद्रशेखर कडू काकडी चावल्यासारखें तोंड कडू करून म्हणाले, " तुम्ही सांगतां हें जर खरें असेल, तर ह्या चुकीची दुरुस्ती व्हावयाला नको होती काय ?–शतावरीबाई, हें सारें खरें काय ? "

" होय." मी उत्तरलें," शतावरी म्हणतात ती मीच."

" तर मग तुमच्याऐवजीं दुसराच फोटो गोष्टींत दडपून छापणाऱ्या संपादकाला काय म्हणावें ? "

" हाच प्रश्न मी तुम्हांला केला तर ? त्या संपादकांच्या वतीनें मी तुम्हाला सांगत्यें कीं, बायकांचे फोटो पहायला हुरळलेले वाचकच आपल्यांत फार. मीं म्हणत्यें, तुम्हांला शतावरीच्या गोष्टी आवडतात ना ? मग त्या वाचा आणि त्यांतच आनंद माना. पण व्यक्तिशः तुम्ही त्या वर्गांतले दिसत नाहीं. स्त्रियांकडे असल्या हिणकस दृष्टीनें पहाणाऱ्या तुमच्यासारख्या पुरुषांच्या डोळ्यांत अंजन घालण्यासाठीं मी म्हणतें, संपादकांनीं केलें तेंच योग्य केलें. "

यावर चंद्रशेखर जास्त कांहींच न बोलतां खट्टू होऊन तडकाफडकीं निरोप घेऊन निघून गेले. त्यांची आणि माझी पूर्वीची ओळख नव्हतीच आणि आतां तर ते मला कुठेंच दिसत नाहींत. कोणी कोणी सांगतात कीं, शतावरी ही कोण याचा निष्कारण काथ्याकूट करणाऱ्या उपद्व्यापी लाळघोट्या लोकांच्या तांड्यांतून ते हिंडत असतात.